# सुमन-हार

## भाग १ व २

‘ कुस्करूं नका हीं सुमनें ’

—तांबे

रामकृष्ण वासुदेव कामत,

आजन्म सेवक, महिला-शिक्षणमंडळ

मालवण ( रत्नागिरी )

मॅक्मिलन् आणि कंपनी, लिमिटेड,

हॉर्नबी रोड, कोट, मुंबई.

 १९३२ [ किंमत ८ आणे

## समर्पण

# 'रसिकांस'—

निर्मोया मधुगंधयुक्त सुमनें ना शक्त होई जरी
मालाकार वनीं फिरोनि बनवी माला सुरम्या तरी ॥
तैशीं सौरभयुक्त काव्यसुमनें ना शक्त निर्मावया
वेंचोनी परि 'हार' हा बनविला, घ्या गोड मानूनियां ॥

संग्राहक

# निवेदन

मुंबई विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां हा 'सुमन–हार' गुंफिला आहे. यांत मराठी भाषेचे आद्यकवि श्री ज्ञानेश्वर महाराज यांजपासून तों सद्यःकालीन यशवंत कवीपर्यंत अनेक कवींच्या सुंदर काव्यसुमनांचा समावेश केला आहे. विश्वविद्यालयानें घातलेल्या मर्यादेमुळें कांहीं सुंदर सुमनें गाळावीं लागलीं त्याला माझा नाइलाज आहे. तरी पण श्री ज्ञानेश्वर महाराजांपासून आजपर्यंत मराठी कवितेच्या रचनेंत, विषयांत व भाषेंत कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं, हें विद्यार्थ्यांच्या मनावर ठसविण्याचा या पुस्तकांत प्रयत्न केला आहे. या पुस्तकांत साधलेला कवींचा कालानुक्रम व त्यांचीं त्रोटक चरित्रें वाचकांना मार्गदर्शक व मनोरंजक होतील अशी आशा आहे.

हा 'सुमन–हार' गुंफतांना माझ्या अनेक मित्रांनीं मला प्रोत्साहन दिलें, व हस्तलिखित प्रत वाचून बऱ्याच महत्त्वाच्या सूचना केल्या, त्याबद्दल त्यांचा, व ज्या निरनिराळ्या कवींनीं आपआपलीं काव्यसुमनें या हारांत गुंफण्याबद्दल मला मोठ्या उदार अंतःकरणानें परवानगी दिली त्याबद्दल त्या सर्वांचा, मी अत्यंत आभारी आहें.

कन्याशाळा, मालवण<br>
रथसप्तमी, शके १८५२

रसिकांचा कृपाभिलाषी,<br>
**रामकृष्ण वासुदेव कामत**

# सुमन-हार



## अनुक्रमणिका

### भाग पहिला



### भाग दुसरा

# तुकाराम



(१६०८-१६४९)

## अभंग

(१)

संतांचिया गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज
संतांचिया गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धनवित्त
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ
संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साट घेती देती
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा

(२)

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती
काय द्यावें त्यांसी व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती
तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत

(३)

भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे
काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे

मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें
तुका म्हणे संतां पिडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां

( ४ )

आतां तरि पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध
तुका म्हणे हित होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें

( ५ )

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें
पाप त्याचें नांव न विचारितां नीत । भलतेंची उन्मत्त करी सदा
धर्मनीतीचा हा ऐक व्यवहार । निवडिलें सार असार तें
तुका म्हणे धर्म रक्षावयासाठीं । देवासही आटी जन्म घेणें

( ६ )

क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी
तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया
तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप

( ७ )

बरें जालियाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं
नोहे मातापिता नोहे कांता सुत । इतरांची मात काय सांगों
तुका म्हणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी

( ८ )

मृगाचिये अंगीं कस्तूरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा
भाग्यवंत घेती वेचूनियां मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें

चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा
अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षावंता दृष्टीं रत्न जैसें
तुका म्हणे काय आंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वायां जाय

( ९ )

अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरी कां हे पाक घरोघरीं
आपुलालें तुम्ही करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य रामराम
देखोनि जीवन जरि जाय तान । तरी कां सांठवण घरोघरीं
देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तयातळीं
हित तरी होय गातां अईकतां । जरि राहे चित्ता दृढभाव
तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची

( १० )

पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा
तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा
द्रौपदी बहिणी वैरीं गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा
प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । आपणाऐसा केला पांडुरंगा
तुका म्हणे तुज शरण निजभावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा

---

# वामनपंडित

## जयद्रथ–वध

सौभद्रशोकविवशें रचिलें पणातें । कुंतीसुतें समजल्याविण आपणातें ॥
तें वाक्य सत्य करवी तव पूर्वजाचें । श्रीकृष्ण नाम भज त्यासि अपूर्व ज्याचें १

मी मारीन जयद्रथासि समरीं जों भानु आहे नभीं
नाहीं होमिन देह हा हुतवहीं सर्वात्मना मी न भीं ।
ऐसें बोलुनि वाक्य त्या परिस तो केला असा नेम रे
रक्षूं त्यासि बळें घडो मग तसें तो स्वापमानें मरे ॥ २ ॥

यानंतरें जथुनि कौरव-राजसेना । आली कशी अवनिमण्डल जें दिसेना ॥
तों पार्थ-सैन्यहि सवेंचि निघे रणाला । ज्या इंद्रही परि नव्हे क्षम वारणाला ३

सूचीव्यूह तयांत पद्म रचिलें राहे तदभ्यन्तरीं
राजा सैंधव तो जयद्रथ तरी चिंता करी अंतरीं ।
व्यूहाच्या वदनीं कृतांतसमसा आचार्य राहे बळें
जे जे ज्या स्थळिं ठेविले नृपवरें ते राहिले तुंबळें ॥ ४ ॥

वदे कृष्ण पाहें नरा द्रोण हा रे । समस्तास्त्रवेत्ता रणीं जो न हारे ॥
जयाचे शरव्रात भात्यांत कोरे । तयाशीं वृथा झुंज लावूं नको रे ॥५॥

पंचाशीति जयासि वर्ष गणना आपांडुता मस्तकीं
युद्धीं द्रोण तथापि दुर्धर दिसे हस्ती जसा मस्त कीं ।
पार्था तूं न भिडें तयासह नको तो आजि नाटोपतो
पाहा दुःसह वाटतो मज रणीं याचा खटाटोप तो ॥ ६ ॥

नमस्कार दूरोनियां सव्यसाची । करी बाणयोगें गुरूला तसाची ॥
सवेगें पुढें तो पृथा-पुत्र धांवे । यदर्थे प्रतिज्ञा तयातें वधावें ॥ ७ ॥
सव्यापसव्यकृतसायकतांडवानें । केलें पराजित रणीं रण पांडवानें ॥
घालूं शके कवण यावरि वीर घाला । जैसा मृगांत मृगराज तसा निघाला ८

कौंतेयाप्रति देवकीय बदला हे भागले वाह रे
जाले फार तृषार्त यत्न करणें जेणें पिपासा हरे ।
बोले पार्थ जळासि यांसि जपतों मी वारुणास्त्रा रणीं
या वीरांसहि वारितों गज जसा सक्रोध आधोरणीं ॥ ९ ॥

तत्काळ वापी रचिलीच पार्थे । वारोनियां वीर बळें अपार्थें ॥
केले युगापासुनि मुक्त देवें । सवेंचि ते घोटक वासुदेवें ॥ १० ॥
आर्द्रपृष्ठ हय पाजुनि पाणी । दों करीं चतुर नीरज पाणी ॥
देखती कुतुक सैनिक सारे । बोलती प्रबळ पार्थ कसा रे ॥ ११ ॥

संयोजिले तुरग शीघ्र रथासि देवें ।
केलें पहा सुकृत पांडुसुतें सदैवें ॥
दे हात पार्थ चढतां स्वरथावरी तो ।
एक्या करें हय चतुष्टय सांवरितो ॥ १२ ॥
होतां असा मग रथारुढ कैटभारी ।
बोले नरा मन तुझें न भया उभारी ॥
अस्ताचला स्वतिलकीकृत भानु गेला ।
वेड्या जयद्रथवधास्तव तूं भुकेला ॥ १३ ॥
हें क्लिष्टवाक्य पडतां श्रवणीं विलोकी ।
सूर्याकडे मग म्हणे मुख केंवि लोकीं ॥

दावूं अतःपर करूं न शकें पणातें ।
हें वाक्य सत्य करिं होमिन आपणातें ।। १४ ।।
अच्यूत हें समजला जगदांतरात्मा ।
बोले शतक्रतुसुताप्रति तो महात्मा ।।
कां धाकलास इतक्यांतचि या वधाया ।
पाहें कशी रचितसें निजयोगमाया ।। १५ ।।

तुझें उणें या स्वजनीं दिसावें । रथीं तुझ्या म्यां मग कां बसावें ।।
मनीं असे कार्य तुझें सजावें । उगेंचि वाटे मज तूं खिजावें ।। १६ ।।
साधावया अर्जुन–कामनेला । अस्तासि मार्तंड निकाम नेला ।
प्रमोद जाला धृतराष्ट्रजांला । कीं आज हा सैंधव वीर जाला ।। १७ ।।
समीप आले नृपलोक सारे । पाहों मरे अर्जुन हा कसा रे ।।
कोणी नरासी करिती खटाळी । ते मारिती हांसुनि मूर्ख टाळी ।।१८।।

पार्था रे रवि हा जयद्रथहि हा हें लक्ष लावीं बरें
बोले अर्जुन लाविलें हरि वदे मारीं, जगच्छेखरें ।
ऐसें त्या प्रति बोधितां झडकरी त्या सैंधवाचा गळा
नेला तोडुनि अर्धचन्द्रविशिखें कीं मस्तकावेगळा ।। १९ ।।



# मुक्तेश्वर

## ‘ भरत-भेट ’

ऋषी आननें आवितां सर्व मात ।
करूं धांवला मंथराजीव–घात ॥
नको पाप हें स्त्रीवधें श्रीवसिष्ठें ।
विचारें करें काढिला एकनिष्ठें ॥ १ ॥

गुरूवाक्य हें सार सिद्धान्त पात्रीं ।
हुताशीं दही राजया वेदमंत्रीं ॥
क्रियाकर्म तें सारिलें सर्व आंगें ।
निघे कानना राघवाचेनि मागें ॥ २ ॥

जटा वल्कलें वेढिलीं, भस्मधारी ।
निराहार, तो निर्जळी, दीनचारी ॥
त्वरें पंथ तो लोटतां शृंगवेरीं ।
दिठी देखतां गूहका कोप भारी ॥ ३ ॥

वधूं चालिला भाविलें राघवातें ।
म्हणे, ‘ दुष्ट हे सर्व मारीन येथें ’ ॥
बळें कोपला नैषदाधीश दंदी ।
तया देखतां कैकयी पाय वंदी ॥ ४ ॥

म्हणे, ‘ हस्तकीं छेदिं या मस्तकातें ।
तरी दुःख हें नोसडी वाड मातें ’ ॥

मनीं शंकला देखतां भाव शुद्धू ।
म्हणे ‘ नेणतां द्रोहिला संत साधू ’ ॥ ५ ॥

गुहें पूजिला, वंदिला, रामबंधू ।
त्वरें कैकयो क्षेम दे सत्वसिंधू ॥
म्हणे ‘ मित्र तूं, राम सौमित्र सीता ।
सुखें राहिलीं, त्या स्थळा दावि आतां ’ ॥ ६ ॥

जो पाळी सृष्टि, काळीरमण धरबळी ज्या जपे सर्वकाळीं ।
जो टाळी मोहजाळीं, सुहृदयकमळीं वास केली सुकाळीं ॥
जो माळी सिंधुबाळींसह शयनजळीं शेषतूळीं मवाळीं ।
हा ! हा ! तो वृक्षमूळीं शयित कुशदळीं, भूतळीं, पांसुमेळीं ॥ ७ ॥

‘ वधूबंधुशीं राम कोठें सुभेटी ? ’ ।
‘ मुनीवाल्मिकी—संनिधीं चित्रकूटीं ’ ॥
‘ त्वरें पाववीं जान्हवी—पैलपारा ’ ।
‘ मिही येतसें राम-भेटी उदारा ’ ॥ ८ ॥

आणूनि नौका शतशा सुतारी ।
गेले नदीतें उतरोनि भारी ॥
मार्गीं सखे बोलति रामगोष्टी ।
आले प्रयागा ऋषिराज भेटी ॥ ९ ॥

मुनीराज देखोनि लोटांगणेशीं ।
शिरीं वंदिलें; राहिले दूरिपाशीं ॥
भरद्वाज पूसे, ‘ जटावल्कलांतें
नृपें वाहिजे ? आणिजे का चमूतें ? ’ ॥ १० ॥

वदे कैकयो ‘ जाणसी सर्व भावा ।
जनीं राम दुष्टा करीं भस्म देवा ! ॥’
मनीं शुद्ध जाणोनियां रामभक्ती ।
म्हणे ‘ साधु ’ आलिंगिला सौख्यचित्तीं ॥ ११ ॥

मुनी वंदिलें चालिले रामठाया ।
पुढां देखिलीं काननें शैलराया ॥
मनीं हर्षला भेटती आजि बंधू ।
निशाणें घनें गर्जला सैन्यसिंधू ॥ १२ ॥

सुमित्रें मनीं भावितां वैरभावो ।
तया शांतवी हस्तकें रामरावो ॥
म्हणे ‘ कैकयीनंदन प्राण माझा ।
वनीं पातला आवडी स्नेहकाजा ’ ॥ १३ ॥

ध्वजविलिखितवज्रें, पादपद्में, सुनेत्रीं ।
निरखित महिपृष्ठीं, पांसु मार्जि स्वगात्रीं ॥
नमन करुनि बोले, ‘ दाविजे राम पायां ’ ।
चकित तंवचि दूरें देखिलें रामराया ॥ १४ ॥

ऐसें दोघां प्रेम आलिंगनाचें ।
रूपीं रूपा मीळणी एक सांचे ॥
आणी द्वैता भक्तिभावार्थ कामा ।
भारी रामा तोष कैवल्यधामा ॥ १५ ॥

# मोरोपंत रामचंद्र पराडकर

## ( मोरोपंत )

( १७२९–१७९४ )

## 'कर्णाचा थोरपणा'

श्रीकृष्ण म्हणे, "कर्णा, तूं कुंतीचा कुमार कानीन ॥
त्वद्वदनोत्थ न पडला अर्थिजनाच्या कधींहि कानीं न ॥ १ ॥
ऐसा वदान्य विद्वान् विश्रुत तूं शुद्ध विप्रजनदास ॥
चाल, भजोत भ्राते तुज, चातक भजति जेवि वनदास ॥ २ ॥
देईल अजातारी मद्वचनें आजि राज्य अभ्राल्या ॥
भ्राल्या न वळेल कसा वळवीलचि धर्म–वायु अभ्रा त्या ॥ ३ ॥
सानुज–सुत धर्म तुला नमिल, सयादव करीन मी नमन ॥
सच्चित्त गुर्वनादर तोयानादर करी न मीनमन ॥ ४ ॥
राज्याभिषेक करितिल तुज मजसह विप्र, भूमिप दरानें ॥
किंबहुना घेइल तव तांबूल क्षिप्र, भूमि पदरानें ॥ ५ ॥
चाल कसा, हो राजा, मातेच्या मानसास दे सुख गा ॥
यांचा तुज काकांचा सहवास, जसा सितच्छदा सुखगा" ॥ ६ ॥
कर्ण म्हणे, "बा देवा, वदसि स्नेहेंचि बा दयालो हें ॥
भट-कर-गें जोडावी स्पर्शमणीची कशी दया लोहें ॥ ७ ॥
निष्फळ कसें करूं गा बा परिह्वत–सर्व–नत–नराधे तें ॥
मेल्यावांचुन द्यावें जोडुनि सुत–शोकवतन राधेतें ॥ ८ ॥

दुर्योधन नांवाचा, राजा मी, सर्व–राज्य–भोग मला ॥
मूर्त नरक, नर कविच्या हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला ॥ ९ ॥
संस्कार विवाहाऽवधि केले माझे यथोक्त सूतानें ॥
निर्मळपणें निघावें रक्तपटांतूनि केंवि सूतानें ॥ १० ॥
समरमखचि होऊं द्या क्षत्रिय सेवूत तल्प न गदांनीं ॥
पुण्यरणमरणदानीं वीरां जें, तें न कल्पनगदांनीं ॥ ११ ॥
श्रीकृष्णजी, करावा कैसा विश्वासघात अवसानीं ॥
युद्ध कसें न करावें आम्हां हा युद्धलाभ नवसांनीं ॥ १२ ॥
तरि मग उरलें काय ? प्रभुजी, त्यजिल्या जरि प्रतिज्ञा त्या ॥
नच सोडवेल देउन धीर भरंवसा अरिप्रति ज्ञात्या ॥ १३ ॥
राज्य न करील, देइल धर्म मला, उमजतांचि हें नातें ॥
देइन सुयोधना मी, तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें ॥ १४ ॥
धारातीर्थींच मिळे सद्गति सत्कीर्ति शुद्धि अधमातें ॥
राज्यपदभोग नलगे द्यावा देवा रणांत वध मातें ॥ १५ ॥
मज समजलें प्रभो, हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र ॥
रवि काळरुद्रदृष्टिसि न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र ? ॥ १६ ॥
तूं स्वाश्रितप्रतिज्ञा करिसिल, न धरूनि शस्त्र, सत्या गा ॥
उरतिल कैसे करिते झाले जे हरुनि वस्त्र सत्यागा " ॥ १७ ॥
देव म्हणे, " राज्य नको ? उपदेश अयोग्य काय हे महिम्या ? ॥
क्लीबाला कन्यासी तुज कां द्यावी बळेंचि हे महि म्या ? ॥ १८ ॥
जेथें भीम धनंजय, बहुदु:सह वासवा रणाजिर तें ॥
हरिलंघन असतांही बाळि–गजसहवास वारणा जिरतें ? ॥ १९ ॥

धनदानें अधनाचा तुमचा तैसाचि काम रणदानें ॥
म्यां पुरविजेल, द्यावीं स्वरगें इतरें, न का मरणदानें ॥ २० ॥
जा, सर्व सिद्ध व्हा, जरि आहे उद्युक्त मानस मराया ॥
सम रायास तुम्हांसहि भीमार्जुन वरद, शीघ्र समरा या ॥ २१ ॥
देईल कुरुक्षेत्रीं धर्म प्रभुवर तुम्हां निधन–दानें ॥
धनदानें जसिं येणें न दिलीं उदकें तथाविध नदानें" ॥ २२ ॥
कर्ण म्हणे, "बा वचना मान्य न झालों म्हणों नको, पावें ॥
वध्यें वधाचि म्हणतां प्रभुनें आग्रह म्हणोनि कोपावें ? ॥ २३ ॥
सत्य उपदेश आम्हीं वरिचेवरि भव्यहेतु झेलावे ॥
जाणोनि सर्व देवा, लाविसि कां बोल ? हे तुझे लावे ॥ २४ ॥
स्वप्नांत पाहिले नृप, शांतनव, द्रोण हाहि दाता हे ॥
घेऊनि उष्ट्रयानीं बैसुनि दक्षिण दिशेस जाताहे ॥ २५ ॥
सहदेव, नकुळ, सात्यकि, भीमार्जुन, धर्म, तूंहि बापा, हे ॥
सप्त तुम्ही श्वेतगजीं, ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे" ॥ २६ ॥
श्रीकृष्ण म्हणे, "बहुधा मरणारचि हे समस्त सुपदेश ॥
कीं तव हृदयें माझा हितहि स्वीकारिला न उपदेश" ॥ २७ ॥
कर्ण म्हणे "भेटि असो परलोकीं मात्र बा दयाळो, कीं ॥
कलहीं स्नेह न राहे हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं" ॥ २८ ॥
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला कडकडुनि भेटला सुचिर ॥
मुग्धासहि जडित कनक–मरकत नग न गमला तसा रुचिर ॥ २९ ॥
झाला मंत्र असा, मग आला नगरांत कर्ण परतोन ॥
पर तो न प्रभु कोपे, वरि पुरता, पूर्ण आंत, पर तो न ॥ ३० ॥

# रघुनाथपंडित

## नलदमयंती स्वयंवर

(घनाक्षरी) बोले नैषधेंद्र वाचा । नाम हेजीब इंद्राचा
किती साक्षेप नामाचा । काय तेणें करिसी तूं ॥ १ ॥
केला काय अंगीकार । बोलूं इंद्रासी निर्धार
तंव ते बोले सुकुमार । चंद्राकार वदनातें ॥ २ ॥
(वसंत०) ऐरावतावरि बसोनि विमान देशीं ।
जो संचरे सुरपती सुखसंपदेशीं ॥
मी भूमिकेवरि असोनि तयास कांहीं ।
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥ ३ ॥
(घना०) नळावेगळा भ्रतार । नलगे स्वप्नीं हें साचार
ऐसा निश्चय विचार । तंव राजेन्द्र बोलतो ॥ ४ ॥
टाकुनि इंद्राचा संभ्रम । धरिसी कां तूं नळ–भ्रम
जाईल विश्राम–विभ्रम । नसता श्रम होईल ॥ ५ ॥
तुझें सौंदर्य पहावया । धरी सहस्त्राक्ष काया
तया वरीं देवराया । नळ–माया टाकुनी ॥ ६ ॥
अथवा तुज तो मोहला । वरूं नेदी नैषधाला
यास्तव याच इंद्राला । माळ गळां घालावी ॥ ७ ॥
(वसंत०) ऐसा अवंचक वदोनि नृपाळ आला ।
इंद्रादिकांसहि निवेदित वृत्त झाला ॥

पाचारिले मग महींद्र विदर्भ—भूपें ।
आले समस्तहि सभेसि सहर्षरूपें ।। ८ ।।

( ओव्या ) नळराजहिरा वरिला । तोचि मनीं म्यां धरिला
सुर किंवा नर भला । न वरीं अन्यातें निश्चयें ।। ९ ।।
ऐसें बोलोनी सुंदरी । बैसे शिबिके भीतरीं
आली राजसभांतरीं । बरोबरी शारदा ।। १० ।।
बोले शारदा तियेला । ऐकें राजांच्या नामांला
मना येईल तयाला । माळ गळां घालीं तूं ।। ११ ।।

( वसंत० ) ज्यांचीं पदें धरिति देव शिरो-ललामीं ।
स्वाराज्य जो मिरवितो गजराजगामी ।।
जो वज्रपाणि बहुलोचनकांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ।। १२ ।।

साहील कोण सजणे बहु तेज याचें ।
मध्यस्थ रूप धरितो हरिचे यमाचे ।।
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ।। १३ ।।

संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणाशा ।
पाप्यांस दंड धरितो करितो विनाशा ।।
देहीं जया मिरविते घनकांति भारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ।। १४ ।।

आधार हाच सजणे बहु जीवनाचा ।
रक्षी दयें करुनि मान्य ऋषीजनाचा ।।

यादांस फार म्हणती जनसौख्यकारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १५ ॥
होतील नंदन विलास जयास तो हा ।
आहे धनंजयहि धर्महि जाण तो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजविता विहारी ।
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥ १६ ॥

(ओव्या) तेव्हां दमयंती सुंदरी । इंद्रादिकां नमस्कारी
तयां बोलली उत्तरीं । अमृतापरीस मधुर ॥ १७ ॥
माझा भीम जैसा पिता । तैसे तुम्ही जी तत्त्वतां
करा कन्यादाना आतां । नळनाथाचे करीं ॥ १८ ॥

(द्रुतवि०) सुर समस्त इच्या वरनिश्चयें ।
सुरस मस्त असें वदले स्वयें ॥
नळ-वराशि वरोनि सुखीं असें ।
तुज नको जन कोण म्हणे असें ॥ १९ ॥

(वसंत०) मावेचना सुख मनीं कमनीय बाळा ।
मायेसही विसरली न पुसेच बाळा ॥
दूर्वादळीं-कदलिबंधमधूकमाळा ।
तीनें अलंकृत करी नळकंठनाळा ॥ २० ॥

---

# ज्ञानेश्वर

( १२७५-१२९६ )

## ' भारतमाहात्म्य '

आतां अवधारा कथा गहन । जे सकळ कथां जन्मस्थान
कीं अभिनव उद्यान । विवेक-तरूचें ॥ १ ॥
ना तरी सर्व सुखाची आदि । जे प्रमेयमहानिधी
नाना नवरस सुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ २ ॥
नातरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार
लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ ३ ॥
नाना कथारूपें भारती । प्रगटली असे त्रिजगतीं
आविष्करोनी महामती । व्यासाचिये ॥ ४ ॥
म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथगुरुवतीचा ठावो
एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥ ५ ॥
एथ चातुर्य शाहणें झालें । प्रमेय रुचीस आलें
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ६ ॥
भानु तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिलें
तैसें व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ७ ॥
कां सुक्षेत्रीं बीज घातलें । तें आपलियापरी विस्तारिलें
तैसें भारतीं सुखाडलें । अर्थ जात ॥ ८ ॥

नातरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होइजे
तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥ ९ ॥
नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण
मग अळंकारीं बरवेपण । निवाड दावी ॥ १० ॥
तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडे तें बरवेपण पातलें
तें जाणोनि आश्रयिलें । इतिहासीं ॥ ११ ॥
नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं । सानीव धरूनी आंगीं
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥ १२ ॥
म्हणऊनि भारतीं नाहीं । तें नोहे लोकीं तिहीं
येणें कारणें म्हणिपे पाहीं । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ १३ ॥

---

# रामदास

(१६०८–१६८१)

## 'सीतेचें अग्निदिव्य'

दळें चाललीं दाटणी थोर झाली ।
सिता शीबिकेमाजि तैशी निघाली ॥
तुरें सुंदरें गंभिरें वाजताती ।
असंभाव्य वाद्यें ध्वनी गर्जताती ॥ १ ॥

समस्तीं सिता देखिली आदरेशीं ।
असंभाव्य सौंदर्य लावण्यराशी ॥
तये देखतां सर्व सूखें निवाले ।
कपी बोलती आणि निष्पाप झाले ॥ २ ॥

सिता देखती जाहली रामचंद्रा ।
नमस्कार केला तसाची महेंद्रा ॥
तया राघवें पाहिलें जानकीला ।
पुढें भ्रूलता वक्र अव्हेर केला ॥ ३ ॥

सभा बैसली त्या द्विजां ब्राह्मणांची ।
असंभाव्य सौंदर्यता त्या सितेची ॥
कितेकीं मनामाजि संकल्प केला ।
तिहीं अंतरीं कल्पिले दोष तीला ॥ ४ ॥

रघूनाथ हा हेत जाणे मनींचा ।
सदा सर्वदा साक्ष सर्वां जनांचा ॥
जिवांतील जाणे तया चोरवेना ।
महा पातकी पाप त्याचें सरेना ॥ ५ ॥

म्हणोनी प्रसंगें उदासीन केलें ।
जनीं कल्पिलें सर्वही व्यर्थ गेलें ॥
म्हणे राम तो जानकी-लागिं जावें ।
स्वइच्छासुखें त्वां दिगंतीं फिरावें ॥ ६ ॥

म्हणे जानकी त्या रिसां वानरांसी ॥
बहूसाल ते कष्ट झाले तुम्हांसी ॥

परी मागुती एक जीवीं धरावें ।
बहूसाल त्या पावका चेतवावें ॥ ७ ॥

पुढें शीघ्र खाणोनियां कुंड केलें ।
असंभाव्य त्या पावका चेतवीलें ॥
शिखा धांवती ऊर्ध्व आकाशपंथें ।
पिडा जाहली खेचरां भूचरातें ॥ ८ ॥

विरंची हरादीक देवां समस्तां ।
मनामाजि ते थोर जाली अवस्था ॥
मुखें बोलती सर्वही कार्य जालें ।
परी मागुती काय हें विघ्न आलें ॥ ९ ॥

स्वभावेंचि हा वन्हि जाळीत आहे ।
तयामाजि हे जानकी केंवि राहे ॥
धडाडीत ज्वाळा पुढें पाहवेना ।
तया अंतरींही उभें राहवेना ॥ १० ॥

मनामाजि पूजा यथासांग केली ।
पुढें जानकी पावकामाजि गेली ॥
तये स्पर्शतां पावकू सिद्ध झाला ।
निवाला प्रसंगीं तयें शांत झाला ॥ ११ ॥

तयामाजि ते जानकी शोभताहे ।
समस्ती सभालोक त्रैलोक्य पाहे ॥
पुटीं घालिजे पूतळी कांचनाची ।
तयेहूनि ते दिव्यकाया सितेची ॥ १२ ॥

अळंकार चीरें बहू पुष्पमाळा ।
सुगंधें तनू चर्चिली दिव्य बाळा ॥
जगज्जननी शीघ्र बाहेर आली ।
सभे देखतां दिव्य सीता निघाली ॥ १३ ॥

महावीर ते गर्जले नामघोषें ।
कपीवीर ते तोषले सर्व तोषें ॥
सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला ।
नभीं दुंदुभीनादकल्लोळ जाला ॥ १४ ॥

पुढें जानकी रामअंकीं विराजे ।
रमा आदिनारायणा जेंवि साजे ॥
असंभाव्य तो वाद्यकल्लोळ गाजे ।
कपीवाहिनीमाजि आनंद माजे ॥ १५ ॥

---

# श्रीधर

( १६७८–१७३० )

## ' शिवयोग्यानें भद्रायूस केलेला उपदेश '

श्रुतिस्मृति पुराणोक्त पाहीं । आदरें वर्तत जाईं
माता पिता गुरु ठायीं । निष्ठा असों दे सर्वदा १

गाई विप्र पाळण । सर्वां भूतीं पहावा उमारमण
वर्णाश्रमधर्माचरण । सहसाही न सांडावें २

विचार केलियावांचूनियां । सहसा न करावी राजक्रिया
मागें पुढें पाहूनियां । शब्द बोलावा कुशलत्वें ३

काळ कोण मैत्र किती । कोण देश कितेक शत्रु द्वेषिती
आदाय काय खर्चाची मिती । पहावें चित्तीं विचारोनी ४

माझें बळ किती शक्ती । आपुले सेवक कैसे वर्तती
यश किंवा अपेश देती । पहावी गती कैशी ते ५

अतिथी देव मैत्र । स्वामी वेद अग्निहोत्र
पशु कृषि धन सर्वत्र । घ्यावा समाचार क्षणक्षणां ६

लेकरूं भार्या अरि दास । सदन गृहवार्ता रोगविशेष
येथ उपेक्षा करितां निःशेष । हानि क्षणांत होय पैं ७

ज्या पंथें गेले द्विजजन । आपण जावें तोची पथ लक्षून
मातापिता-गुरु-निंदा जाण । प्राणांतींही न करावी ८

वैश्वदेव समयीं अतिथी । आला त्यास न पुसावी याती
अन्नवस्त्र सर्वां भूतीं । द्यावें प्रीतीं प्रीत्यर्थशिव ९

परोपकार करावा पूर्ण । परपीडा न करावी जाण
करावें गोब्राह्मण–पाळण । सुजाण म्हणती त्यास १०

निंदा वाद टाकोन । अखंड कीजे शिवस्मरण
त्याचें नांव म्हणावें मौन । शिवसेवन तप थोर ११

परदारा आणि परधन । हें न पहावें जेवीं वमन
करावें प्रीतीं शास्त्रें श्रवण । शिवपूजन यथाविधी १२

दुर्जनासी दंभ दाविजे । भल्याचे पदरज वंदिजे
अहंकारें पृथ्वी जिंकिजे । निरहंकार द्विजासीं १३
वाचा सावध स्मरणीं । पाणी सार्थक दानें करूनी
पद पावन तीर्थादिगमनीं । निश्चल शिवध्यानीं बैसावें १४
पुराणश्रवणीं श्रोत्र सादर । त्वचा संत–आलिंगनीं पवित्र
सार्थक शिवध्यानीं नेत्र । जिव्हेनें स्तोत्र वर्णावें १५
संतासीं मैत्री प्रेम ईश्वरीं । द्वेषी देवाचे त्यांची उपेक्षा करीं
युक्त निद्रा युक्त आहारी । मृगया करीं परम मितिची १६
अतिविद्या अतिमैत्री । अतिपुण्य अतिस्मृती
उत्साह धैर्य दान धृती । वर्धमान असावी हे १७
बंधु सोयरे श्वशुर स्वजन । यांसीं स्नेह असावा साधारण
भलता विषय देखोन । आसक्ति तेथें न करावी १८
दारा धन आणि पुत्र । यांसीं आसक्त नसावें अणुमात्र
अलिप्तपणें संसार । करोनि असक्त असावें १९
सत्पात्रीं देतां दान । होय ऐश्वर्य वर्धमान
अपात्रीं दानें दारिद्र्य पूर्ण । शास्त्रें प्रमाणें जाणिजे २०
विपरीत काळीं धैर्य धरी । वादीं जयवंत वैखरी
युद्धीं पराक्रम करी । याचकांसी पृष्ठी न दाविजे २१
प्रतापें व्हावें तप्त । परसौख्यें हर्षभरित
सद्वार्ता ऐकतां सुख । तोचि भक्त शिवाचा २२
वर्म कोणाचें न बोलावें । संत भक्तांचे आशीर्वाद घ्यावे
भाग्य-आभाळ येतां स्वभावें । स्वधर्म-ध्रुव न ढळावा २३

नराची शोभा स्वरूप पूर्ण । स्वरूपाचें सद्गुण आभरण
गुणाचे अलंकार ज्ञान । ज्ञानाचें भूषण क्षमाशांती २४
कुळ शील विद्या धन । राज्य तप रूप यौवन
या अष्टमदें करून । मन भुलों न द्यावें २५

---

# मोरो गणेश लोंढे

(१८५४–१९२०)

## रायगडावर काय आहे ?

राष्ट्राचा इतिहास पूर्ण करणें कर्तव्य हें आपुलें ।
ज्याच्या निर्मल हृत्पटावर असे हें स्पष्ट रेखाटलें ।।
त्यांनीं रायगडीं प्रवास करुनी घालावयाला भर ।
त्यामध्यें निजबुद्धिला रमवुनी व्हावें सदा तत्पर ।। १ ।।
तेथें काय असे गडावर असें आणा न चित्तीं कदा ।
तेथें काय नसे मनास अपुल्या ऐसें पुसावें सदा ।।
केलें राज्य शिवाजिनें बनवुनी जें वर्णनीय स्थल ।
तेथें काय कमी तयास पडतें सद्बुद्धिचें ज्या बल ! ।। २ ।।
येतां तो इतिहासकार वरती लेखांप्रती जीववी ।
कोठें काय असे बघून नयनीं चित्तांत तें सांठवी ।।

भ्रांती दूर करी बघून अवघें, सत्यास घे शोधुनी ।
या यत्नें शिवरायवृत्त सगळें लोकांस दे सांगुनी ॥ ३ ॥
येई येथ चरित्रकार तरि तो संजीवनी मेळवी ।
सांगाड्यामधिं चेतना भरुनियां त्यालागिं तो खेळवी ॥
डोळ्यांनीं बघतां स्थळें मतिलता घे चारुता ती नवी ।
काळोखांतिल वस्तुला नव जसें सौंदर्य देतो रवी ॥ ४
आला तो जरि चित्रकार वरती चित्रें जुनीं रंगवी ।
किंवा नूतन योजुनी निजमनीं काढूनियां दाखवी ॥
टोंकाच्या वरुनी निघे हिरकणी धैर्यें तळीं यावया ।
किंवा यत्न करी महार वरती जाण्यास, काढी तया ॥ ५ ॥
हर्म्याचा अवशेष भाग लिहुनी दावील तो सज्जनां ।
किंवा जीर्ण समाधि चित्रि लिहुनी बोधील त्यांच्या मना ॥
किंवा तो इतिहास रम्य जिववी जो जाहलासे जुना ।
लोकांचें रमवून चित्त सहजीं मोहील जिज्ञासुंनां ॥ ६ ॥
कोणी कल्पक येथ ये तरि लिही कादंबऱ्या सुंदर ।
वाचाया झटतील लोक सगळे ठेवूनियां आदर ।
दावी धीर उदात्त वृत्ति सगळ्या लोकां शिवाच्या जरी ।
कर्तव्यास करून धन्यपण तो घेईल लोकीं तरी ॥ ७ ॥
कोणी नाटककार येउनि वरी पाही समाधीप्रती ।
होतां दर्शन निर्मळीं शिवगुणीं रंगेल त्याची मती ॥
शृंगारादिक सज्जन-प्रिय-रसां त्याच्या चरित्रीं भरी ।
प्रेमें नूतन नाटकांस रचुनी तल्लीन लोकां करी ॥ ८ ॥

येथें ये कवि दर्शनार्थ तरि तो चित्तांत दुःखें भरे ।
भग्ना पाहुनियां समाधि जल तन्नेत्रांतुनी पाझरे ॥
स्फूर्तीचे फुटतील नूतन गमे वाणीस त्याच्या झरे ।
जैसा पाहुन चंद्रकांत विधुला प्रेमामुळें पाझरे ॥ ९ ॥

पूर्वींचा इतिहास रम्य सगळा चित्तांत त्याच्या स्फुरे ।
त्याची लीन मति क्षणीं शिवगुणीं रंगूनियां नावरे ॥
त्याची चित्र-चरित्र-गायनरसीं वाणी शिवाच्या शिरे ।
चाखाया रस त्यांतला रसिक ते होतील कीं घाबरे ॥ १० ॥

जिज्ञासावश जाल होउन तरी ज्ञानार्थ जोडाल कीं ।
प्रेमानें जरि जाल येथ भर ती घालाल मोठी सुखीं ॥
कर्तव्यास मनीं धराल तरि दे उत्साह तुम्हांप्रती ।
टाका आळस जा वरी बघुन घ्या नेत्रीं शिवाच्या कृती ॥११॥

---

# गंगाधर रामचंद्र मोगरे

(१८५७-१९१५)

## सह्याद्रि

कोठें दुर्गम उंच उंच शिखरीं भेदोनि तारापथा ।
विंध्याद्रि—व्रत आचरोनि अडवूं पाहे रवीच्या रथा ॥
कोठें भार्गवराममार्गणभयें जो भीरु मागें पळे ।
त्याचा मारहि साहुनी पुरवितो प्रेमें मुलींचे लळे ॥ १ ॥

कोठें खोल महाभयानक दरी पाहोनियां ज्यांकडे ।
सूर्याचे करही भयें दचकुनी माघारती बापडे ॥
कोठें घोष करीत पुण्य तटिनी जातां समुद्राकडे ।
खालीं आदळती धडाधड जणूं पापाचलाचे कडे ॥ २ ॥

कोठें शीतळ वाहती झुळझुळां अच्छोदकाचे झरे ।
ज्यांच्या केवळ दर्शनेंच सगळी तृष्णा जनांची हरे ॥
कोठें रम्य सरोवरें, स्फटिकभा शुद्धोदकें ज्यांचिया ।
केली लज्जित शारदेंदु-किरणां देखोनियां आश्रया ॥ ३ ॥

कोठें व्योमपथें महीरुह शिरें उंचावुनी आपलीं ।
घालाया बघती जणूं निजगळां निःसार मेघावली ॥
कोठें पालवतां लता रुचिरता साऱ्या प्रदेशास ये ।
वाटे पांघुरली सुरम्य हिरवा शेला वनश्री स्वयें ॥ ४ ॥

ताराया भजकां सदाशिव कुठें ज्योतिःस्वरूपें वसे ।
कोठें येउनि ही हिमालयसुता ह्या सप्तशृंगीं बसे ॥
कोठें ह्या विवरीं लपोनि बसती बौद्धादिकांच्या कृती ।
होते कुंठित ज्यांकडे निरखितां कारागिरांची मती ॥ ५ ॥

कोठें हे उंच माना करुनि गड यशस्तंभ राया शिवाचे ।
देती आम्हां मराठ्यां स्मरण घडिघडी आमच्या वैभवाचें ॥
गेला ! तो काळ गेला निघुनि विभवही नष्ट तें सर्व झालें ।
गेलें तें तेज गेलें ! पुरुषवरहि ते भाग्यशाली निमाले ! ॥ ६ ॥

नाहीं घोरपडीशिवाय शिवली भिंतीस ज्याच्या शिडी ।
फेंकाया शकले न दृष्टि रिपुही ज्याच्याकडे वांकडी ॥

तान्हाजीसम वीरसिंह पडला ज्या कारणें संगरीं ।
त्या ह्या सिंहगडीं निरंतर शिवा स्वाराज्य आतां करी ! ॥ ७ ॥

ज्याचा मावळुनी प्रतापतरणी केव्हांच गेला तरी ।
गर्वें मान वरी करोनि बसला जो ह्या गिरीच्या शिरीं ॥
तो हा पाहुनियां प्रतापगड त्या राया शिवाची कृती ।
त्याच्या वाघनखांसह स्मरुनियां तल्लीन होते मती ॥ ८ ॥

जेथें ऐकुनि चौघडे धडकतां राज्याभिषेकोत्सवीं ।
नाचे हर्षभरें विरक्तहि तरी तो जावळीचा कवी ॥
त्या ह्या रायगडावरोनि भगवा झेंडा पडे खालती ।
ऐसें पाहुनियां गळे सहजची त्या मावळ्यांची धृती ॥ ९ ॥

सह्याद्रे ! तुज पाहुनी प्रथम जो आनंद झाला मला ।
त्याचा एकहि लेश यावरि नसे चित्तांत ह्या राहिला ॥
आतां राहुनियां इथें असुखची होणार आहे मना ।
दुःखें यास्तव आज सोडुनि तुला ही चालली कल्पना ॥ १० ॥

---

# नारायण वामन टिळक

( १८६५-१९१९ )

## श्रमसौंदर्य

फुलें गुंफावीं । तुज म्हणुनी जन्म प्राप्ती !
तूं फुलमाळी नलगे भ्रांति । कुऱ्हाड परि तव खांद्यावरती
हा काष्ठांचा डोंगर पुढतीं
पुरी रे फजिती । तव जन्माची ही माती ! १
मातींतच परि फुलें उगवती । मातीहुनि जरि भिन्नें दिसती
अंधाराच्या उदरीं येती,
रम्य नक्षत्रें । ही परमेशाची नीति ! २
कुऱ्हाडिचें मम बघ रे पातें । रत्न केतकी पर्णच नुसतें
नागासम मज हें डुलवीतें
अहा देवाची । मजवरी दया ही पुरती ! ३
देहतरू हा माझा फुलला । घर्मबिंदुनीं म्हणशिल ओला
म्हण; परि सुमनांचा हा मेळा—
मला दे शोभा । ती अभिनव अवघ्या जगतीं ! ४
आघातांनीं चिन्हें केलीं । म्हणशिल, म्हण; परि सुमनें सगळीं !
मुठींत माझ्या मीं सांठविलीं
सदां फुललेलीं । हीं म्लान न केव्हां होती ! ५

बघ या अधरीं, बघ या नयनीं । फुलें किती हीं भरलीं खचुनी
हीं स्वर्गांतुनि पडलीं गळुनी !
हींच उधळीतों । मी ज्याच्यात्याच्यावरती ! ६

---

# कृष्णाजी केशव दामले

## ( केशवसुत )

( १८६६-१९०५ )

### जगामधीं या तुला कशाला परमेशें धाडिलें ?

जगामधीं या तुला कशाला परमेशें धाडिलें ?—
कराया श्रम तुजला योजिलें
मधुर माधवी-कुंज आपुले विस्तृत करणें कधीं
देऊं नको सोडुनि गा तूं मधीं;
घाम उन्हाचा फार येइल बा तुला
पण धीर धरीं, जों अस्तसमय पातला,
जों कालाच्या मंजुल घण्टाटंकारें सुचविलें—
चला रे काम अतां संपलें. १
देवें उटणीं तुला चर्चिलीं काय म्हणुनि सांग कीं ?—
झगडण्या, नच पडण्या मंचकीं !

स्फटिक ते धवल जेंवि शोभले
अश्रु ते तेंवि तुवां ढाळिले
तुझ्या धाकल्या उद्यमबन्धूंकरितां, देवें भलें
भुजालंकरणीं ते गोंविले. २

धैर्य आणि ती कार्यनिरतता दावुनि तूं आपुली
बांधवीं स्फूर्ति पसर चांगली;
तुझें बघुनि ते हृदयीं धीरता घेतिल मग लागली
करीं ही धरितिल कृत्यें भलीं;
मग—काय सांगणें !—द्वारें तुझिया तयां
देइल सुफलें ईश्वर हरिखूनियां
अल्प पुष्पही बिन्दु हिमाचे अपुल्या पेल्यांतले
वांटितें भावंडीं आपले ! ३

---

# श्रीमती लक्ष्मीबाई टिळक

( १८७० )

## पाहिलें मी माझ्या प्रभुकडे !

( ता. ९।५।१९१९ रोजीं नारायण वामन टिळक वारले. ता. ५।८।१९१९ रोजीं श्री० लक्ष्मीबाईचा नातू नारायण हा जन्मला. मुलाकडे पाहून लक्ष्मीबाईचे डोळे भरून आले—त्यावेळेस त्यांनीं ही कविता लिहिली. )

दुःखार्णविं मी बुडतां बुडतां हळुच एक ऊठली ।
लाट ही प्रेमाची धावली ॥

त्या लाटेनें हळुच आणुनी तीरावर सोडिलें ।
जरी मज पुरें पुरें भिजविलें ॥
शीतल वायू प्रखर सूर्य हा करी मला कोरडें ।
तरी कां येतें मजला रडें ॥
आसवें कशाचीं सांगा मजला कुणी । मी हंसतें रडतें, वेड लागलें मनीं ।
रडवितीं हंसविती जुन्या नव्या अठवणी ।
एक नयन मम गाळी अश्रु दु:खाचे परि दुजा ।
म्हणे मज सौख्याश्रूंनीं भिजा ॥ १ ॥
सुखदु:खाचें भांडारच हें उघडें माझ्यापुढें ।
पाहिलें मी माझ्या प्रभुकडे ॥
महिमा त्याचा गौरव त्याचें त्यानें तें आपुलें ।
उघडुनी पुढें अहा मांडिलें ॥
जरा थबकलें, धावुनि गेलें, पायांना बिलगलें ।
अश्रुनीं प्रभुचरणां भिजविलें ॥
तो मला म्हणे घे तुज व्हावें तें करीं । मी तुला सांगतों सौख्याला तूं धरीं ।
ही कृपा जाहली देवाची मजवरी ।
बालकवी हा जगीं धाडिला देवानें मजकडे ।
चिमुकलें बालक माझ्या पुढें ॥ २ ॥
वंशवृक्ष हा माझा फुलला, बघुनी त्याच्याकडे ।
शिंपिले अश्रूंचे मी सडे ॥
सुखदु:खाचा वांटेकरि मम माझ्याजवळी नसे ।
पाहुनी मजला स्वर्गीं हंसे ॥

हंसें फुलांचें सदा जयाच्या हृदयामध्यें वसे ।
तयाला दुःख पहावें कसें ? ॥
तो देवाजवळी काय विनंती करी । ही रिती जहाली जागा परतुनि भरी ।
जगिं सेवा नाहीं झाली माझी पुरी ।
म्हणुनि धाडिला जोडेकरि हा माझ्या बाळाकडे ।
चिमुकलें बालक माझ्यापुढें ॥ ३ ॥
पाय गोजिरे हाणी माझ्या हृदय-कपाटावरी ।
फोडुनी दुःख तयानें हरी ॥
साहुन ऐशा अपमानातें आलें मजला हंसें ।
कळलें नाहीं मज तें कसें ॥
हंसतें मी हें पाहुनि आली आशा माझ्याकडे ।
घेउनी मज संगें वर चढे ॥
ह्या आनंदाच्या उंच उंच गिरिवरी । मज घेउनि गेली दाखविले ते दुरी ।
मम जुनेपुराणे किल्ले त्याच्यावरी ।
हा सोन्याचा काय हिऱ्याचा कळस त्यावरी चढे ।
चिमुकलें बालक माझ्यापुढें ॥ ४ ॥

---

# डॉ. काशिनाथ हरी मोडक

## ( माधवानुज )

( १८७२–१९१६ )

### नामलेखन

हिंडतां सहज सागरतीरीं । लाधली मजासि शिंप रुपेरी ॥
तीस घेउनि करीं लिहिलें मीं । आत्मनाम सिकतेवर नामी ॥ १ ॥
राहिलों मग जरा जलधीची । कांति देखत मनोहर साची ॥
लाट एक इतुक्यांत निघाली । अक्षरें धुवुनि ने लिहिलेलीं ॥ २ ॥
अब्धिची अदय देखुनि लीला । जाहलें विपुल दुःख मनाला ॥
दूषिलें कटुवचें बहु त्याला । मानसीं क्षण विवेक न केला ॥ ३ ॥
वीचि वारिधि पुन्हा वर फेंकी । योग्य बोध मजला करण्या कीं–॥
"दुःख सोड, मनुजा सकलांची । शेवटीं स्थिति अशी घडण्याची ॥४॥
काल सागर भयंकर फार । गर्जतो निशिदिनीं अनिवार ॥
फेंकुनी अपुलिया लहरीतें । जें दिसे त्वरित सर्व हरी तें ॥ ५ ॥
नांव गांव तव सद्म शरीर । सर्व जाइल लयास अखेर ॥
जें असे उघड नश्वर त्याचा । मानसीं वद विषाद कशाचा ?" ॥ ६ ॥
दिव्य बोध किति हा जलधीचा ! । घेउनी समजुनी मनिं साचा ।
जो जगांत निज वर्तन ठेवी । दुःख त्यास कुठुनी भय दावी ? ॥ ७ ॥

# विनायक जनार्दन करंदीकर
## ( विनायक )

( १८७२-१९०९ )

### सुवास

[ ओसाडींत सहल करीत असतां कवीला मधून कस्तूरीसारखा वास येई. ( हा वास जुन्या भुजंगाच्या श्वासाचा असतो म्हणतात ) वास कसा आला, कोठून आला, म्हणून त्यानें पुष्कळ शोध केला; पण व्यर्थ! त्या नादांत त्याच्या मनाची जी स्थिती झाली, तिचें खालील पद्य हें चित्र होय. ]

हिंडत असतां निर्जन रानीं । स्वैरगतीनें गुंगत गाणीं
मधुर सुवास घ्राणीं आला । त्या योगानें आत्मा धाला
उद्भवला हा परिमल कोठें ? । पडलें मजला कोडें मोठें
फिरलों-स्थिरलों ठायीं ठायीं । मूळ तयाचें कळलें नाहीं
कार्य आणि कारण या जगतीं । तीच वस्तु नटलेली दिसती
तैसें माझें मानस आतुर । शंका काढी-देई उत्तर
सुगंध जो का अंगीं दाटे । पुष्पमिषें प्रकटावें त्यातें
पुष्पें-ज्यांना नाहीं जोड । रंगें, रूपें, वासें गोड
हुंगीना परि कोणी त्यातें । त्याच्या आस्वादी न रसातें
खेळावीं जीं रसिका हातीं । होते त्याची संतत माती
ओसाडींतील गुलाबातें । खिन्नपणा याकरितां वाटे
टाकि उसासे सारा वेळ । त्याचा हा का गंध असेल ?

× × × ×

वागविली निज हृदयप्रांतीं । भक्तीनें रमणाची मूर्ती
भजली अर्पण करुनी त्याला । प्रेमाच्या पुष्पांची माला
काय होय तें परि पुरुषाला । नवपुष्पावरच्या भ्रमराला ?
विमुख तिला तो हाय ! जाहला । अंतरली स्त्री सर्वस्वाला
बाला भग्नमनोरथ झाली । मौक्तिकांपरी अश्रू ढाळी
दुःखानें एकांतीं स्फुंदे । काय तेंच या स्थानीं गंधे

× × × ×

मात्सर्याचा भरला वारा । अहंपणाचा सर्व पसारा
अज्ञानाची मिरवे द्वाही । रसिकत्वाला थारा नाहीं
काय अशा जनतेंत रहावें ? । काय पहावें ? काय चहावें ?
बरें राहणें निर्जन रानीं । ओढ्यासंगें गाणें गाणीं
यापरि वैतागून कवीनें । ओसाडींत स्वच्छंदानें—
वाजविला जो सुस्वर पांवा । त्याचा का हा वास असावा ?

× × × ×

परिमल-कारण कळलें नाहीं । उगमस्थळ आढळलें नाहीं
व्यर्थ हिंडलों झालों वेडा । वेडा ! वेडा ! वेडा ! वेडा !
परिमल-कारण मजला कळतें । उगमस्थल किंवा आढळतें—
सांठवितों कवितेंत तयाला । वाग्देवीला सुखवायाला !
स्वानुभूत वासाचें दान । करावयाला जोंवर ये न
तोंवरि कवितालतिकेवरती । कर्णिकार सुमनांची भरती ।

---

# भास्कर रामचंद्र तांबे

( १८७४ )

## १ गुराख्याचें गाणें

कुरणावरती वडाखालती गाइ वळत बैसतों । मजेनें ।
स्फटिकापरि निर्मळ हा खळखळ झरा जवळ वाहतो ॥ ध्रु० ॥
पांवा फुंकुनि मंजुळ नादें रान भरुनि टाकतों । हिरवें रान० ।
आनंदानें डोळे भरतां प्रभुजीला प्रार्थितों !
गाईमागें रानोरानीं शीळ भरत हिंडतों । कधिंकधिं ।
दऱ्याखोऱ्या राइ ओहळावरी मौज मारितों ।
उन्हाची भीति कवणाला ? पाउस काय करिल तो मजला ?
भीतों कोठें मी थंडीला ?
श्रीमंतापरि गरिबा कोठें वारा तो दुखवितो । गरिबा वारा नच दुखवितो ।
देवाजीवरि सदा हवाला टाकुनि मी राहतों ॥ १ ॥
तृषा लागतां नीर झऱ्याचें ओंजळिनें मी पितों । निर्मळ० ।
क्षुधा लागतां कांदाभाकर यथेच्छ मी जेवतों !
फिरतां फिरतां करवंदेंही तोडुनि मी भक्षितों । रानीं० ।
काठीनें मी कांटे दाबुनि बोरेंही तोडितों !
धनिका ताट रुप्याचें जरी, पांचही पक्कानें त्यावरी,
नाहीं गोडि मुखाला परी,

गाईसंगें हिंडुनि रानीं थकुनि सुखें जेवितों । रानीं० ।
जाडें भरडें खाउनि धनिकाहूनि अधिक तोषतों ! ॥ २ ॥
पुच्छ उभारुनि थवा गाइंचा ज्यावेळीं नाचतो । मजेनें० ।
मोरमुगुटबन्सीवाल्यापरि मौज उभा पाहतों !
ओहळावरती थवा तयांचा पाणी जेंव्हां पितो । निर्मळ० ।
उभा राहुनी प्रेमें त्यानां शीळ अहा घालतों !
कशाला मंदिल मज भरजरी ? घोंगडी अवडे काळी शिरीं
दंड करिं गाइ राखण्या परी ।
कुवासना घालिति धिंगा तो महाल मी टाकितों । नृपाचा ।
गाईंसंगें हवेंत ताज्या नित्यचि मी राहतों ॥ ३ ॥
क्रोध, काम, मद, मत्सर यांहीं गांव सदा गर्जतो । भांडणें० ।
दूर टाकुनी त्यास शांतिनें सुखें दिवस लोटितों !
समाधान हा परिस अहा मज रानांतचि लाभतो । अहा० ।
दुःखाच्या लोहास लावितां सुख-सोनें बनवितो !
चढल्या पडावयाची भिती, गरिबा अहंकृती काय ती ?
काय करि त्याचें खोटी स्तुती ?
परवशतेच्या बिड्या रुप्याच्या पायांत न बांधितों । मृदुल जरि० ।
निजहृदयाचा धनी धरणिचें धनित्व अवमानितों ॥ ४ ॥



# दत्तात्रय कोंडो घाटे

## ( दत्त )



( १८७५—१८९९ )

### प्रभात

प्रभात झाली रवी उदेला ऊठ उशिर झाला
प्रेमळ भावें सरळ मनानें वंदिं जगत्पाला १
दहिंवर पडलें मौक्तिकवृष्टि जणुं भूवर झाली
प्रेमरंगरंगित ही स्मितमुखि पूर्व दिशा खुलली २
मंद मंद मधुगंधि समीरण येती भेटाया;
आलिंगुनि सांगती ‘ काळ हा दवडूं नका वांया ’ ३
हास्यवदन ती सुमन—मंडळी उठुनि उषःकालीं
दहिंवरतोयें जणुं का प्रातःस्नान करित बसली ४
प्रसन्नवदना वनलक्ष्मी ही शुचिर्भूत दिसते;
नानाविध नवपल्लव वाहुनि देवपुजा करिते ५
तरुवर उठले, प्रफुल्ल झाले, आनंदें डुलती
तन्मय होउनि मानसपूजा जणुं का हे करिती ६
विहंग उठले, गाउं लागले तरुवरि केव्हांचे
मंजुळ वाणी ऐक, जणूं हे गायक स्वर्गींचे ७

गगनविहारी खग वैतालिक वायूवरि बसुनी
प्रभुगुण गाती उंच अंबरीं तल्लिन होऊनी ८
खळखळ वाहत लगबग येती तटिनी गिरिवरुनी
देवदर्शना जणूं चालल्या भाविक या तरुणी ९
तरुवसनावृत तुंग पुरातन पर्वत हे दिसती
वल्कलधारी आद्यऋषी जणुं ध्यान धरुनि बसती १०
जिकडे तिकडे मंगलमय हें भूमंडल दिसतें
ऊठ मानवा! आळवि प्रभुला जाइं शरण त्यातें ११

---

# दत्तात्रय अनंत आपटे

## ( अनंततनय )

( १८८२—१९२९ )

### पुष्प आणि मानवीजीवित

मनोज्ञ नवपुष्पिता विकसिता सुरम्या लता ।
तसे सुतरु पाहिले उपवनांत आंदोलतां ॥
सुगंध पवनें किती विखुरिला सुखोद्दीपक ।
प्रफुल्ल मन जाहलें, करि जसा गृहा दीपक ॥ १ ॥

समग्र गृहयातना विसरलों घडी एक मी ।
निसर्गवनदेवता–सदनिं सौख्य का ये कमी ? ॥
असो, सहज पाहिलें गलितपुष्प मी सुंदर ।
करीं धरुनि हुंगिलें बहुत दावुनी आदर ॥ २ ॥

प्रमोदयुत मानसें सुमन लीलया पाहतां ।
विचार शतशा मनीं उभवले तदा तत्त्वतां ॥
तयें सु-मन वेढिलें जशि समस्त पृथ्वी तमीं ।
मुदें सकल गोंवितों सुरसवृत्त पृथ्वींत मी ॥ ३ ॥

जनीं मनुजजन्म तो कुसुमसा मला भासतो ।
विचार करितां मनीं अमित देइ लाभास तो ॥
सुपुष्प मुकुल स्थितींत असतां तदामोद कीं ।
मनोभ्रमर गुंगवी शिशु जसा भुले मोदकीं ॥ ४ ॥

तसा मनुज हर्षतो उपजतां गृहीं नंदन ।
असेल कुणि का असा कुमति जो गणी नंद न ? ॥
हरीख परमावधी उमलतां कळी होतसे ।
वयांत नर येइ जों बहुत सौख्य दे हो तसें ॥ ५ ॥

सुमा चुरडितां अशा नयन मोहका लागती ।
मनास चटके खरे चटचटा न त्याला गती ॥
तया सहज नेतसे यम नरा मुळीं ना कळे ।
त्वदीय कृति केंवि भो ! अबल मंदधींना कळे ॥ ६ ॥

गमे सकल शून्य तें नर गतासु होतां तया ।
तदीय सुहृदां जनां लव सुचे न हो ! तातया ॥

दिसे न कधिं कीं पुन्हां मनुज तो जगाभीतरीं ।
अशाश्वतहि भासती सुममनुष्य ऐसे तरी ॥ ७ ॥
सुरम्य कुसुमा ! तुझी रुचिरता विनाशी परी ।
सुगंध किति वेळसा वद टिकेल तैसा तरी ? ॥
दिनैक दिन दोन वा मग सुकोनि कीं जाशिल ।
पदच्युत करील बा चुरगळोनि कोणी खल ॥ ८ ॥
प्रभूचरणिं वा शिरीं तनु समर्पिशी तूं जरी ।
तरीच तव धन्य बा उमलणें फुला ! भूवरी ॥
किती नव तृणांकुरें उपजती प्रति-प्रावृटिं ।
तपीं गळुनि बापुडीं, पडति पाहिं पृथ्वी–पुटीं ॥ ९ ॥
तसे मनुज हो ! फुलासम तुम्ही गमा या जनीं ।
न धन्य जनु युष्मदीय शिणल्या वृथा या जनीं ॥
अशाश्वतचि आयु हें धनसुतादि ते व्यर्थ कीं ।
प्रभुत्व इहवस्तु या क्षर न लाविती सार्थकीं ॥ १० ॥
व्हावें जन्मुनि धन्य या क्षितितळीं ऐशी जरी कामना ।
जिव्हेनें हरि गाउनी निशिदिनीं ठेवा मनीं काम ना ॥
पूजा श्रीधर हस्तकीं, यदुपती नेत्रीं पहा सर्वदा ।
श्रोत्रीं कृष्णकथा-सुधा पिउनियां प्रेमें भजा सर्व-दा ॥ ११ ॥

---

# राम गणेश गडकरी

( गोविंदाग्रज )



( १८८५–१९१९ )

## अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस

[ मध्यरात्रीच्या सुमाराला कोकिळेचा शब्द, विषण्ण व निराश हृदयाला किती सांत्वनपर वाटतो, याची सुखनिद्रित मनाला साक्ष पटणार नाहीं ! ]

अवेळ तरि ही बोल-कोकिळे-अवेळ तरिही बोल ॥ धृ० ॥
रात्र पसरली जगतावरती, भुरके काळे मेघहि फिरती,
वारा वाहे भरभर भंवतीं,
बालचंद्र चंद्रिका घाबरी गोरीमोरी होत ! १
उदासीनता छाया पसरी, सृष्टि दिसे जरि वरुनी हंसरी,
खिन्नताच तरि अंतरिं सारी,
व्यर्थ बोलतो, व्यर्थ डोलतो, संसाराचा गोल ! २
आनंदाच्या प्रात:काळीं, दिवसाच्या गजबजल्या वेळीं,
किंवा संध्या जेव्हां नटली,
आनंदाचीं गाणीं गाया गवई लाखकरोड ! ३
असतां आनंदाची माया, वृद्धि क्षणभर तिची कराया,
लागे ज्याचा तोच गात्रया,
आनंदाला द्विगुणित करिती आनंदाचे बोल ! ४

परंतु जेथें उदासीनता, व्याकुळ करिते विषण्णचित्ता,
तेथें त्याला द्याया समता,
गाणें गावें हेंच अलौकिक ईश्वरतेचें काम ! ५
बाह्य सृष्टि जरि निद्रा भोगी, अंतःसृष्टि तरी हतभागी,
रडते तशीच राहुनि जागी,
निजवाया तिजलागीं असलें गाणें गाई गोड ! ६
अवेळ येथें कसली बाई ?, दुःखसांत्वना गा केव्हांहि !
अनुकंपेला नियम न कांहीं !
रित्या मनीं या ओत सूर; त्यां जाऊं दे अति खोल ! ७
वळवाचा हा वारा गार, झोंबुनि पीडा देई फार,
येत गवाक्षांतुनि अनिवार,
येतां जातां सूर काढितो भलभलते भेसूर ! ८
या अवकाळीं-या एकांतीं, निद्रेची मिळवाया शांति,
थकुनि भागुनी पडलों अंतीं,
निद्रा कुठली परि त्या हृदया, भविष्य नाहीं ज्यास ! ९
हातीं संसाराची माती, मनिंच्या आशा मनाच खाती,
भूतकाळचीं भूतें रडतीं,
मिटल्या जाग्या डोळ्यांपुढतीं शून्याचें मैदान ! १०
निष्प्रेमाची शेज सोबती, भयाण दुनिया सारी भंवती,
विषण्ण येती विचार चित्तीं,
बाह्यांतर विश्वांत खेळते उदासीनता एक ! ११
गा तर चित्ता मम रमवाया, हीच खरी जादूची माया,
आनंदा खेळविणें वाया,

मशाल दिवसा लावुनि होतो लाभ कुणाला काय ! १२
दूर कराया उदासीनता, गाच गडे ! अंगाई-गीता,
झोंप येउं दे माझ्या चित्ता,
लक्ष्य लागतें सुरांकडे तव; वाटति ते बिनमोल ! १३
पाहुनि ही तव दयाशीलता, द्रवेल कोणी भगिनी माता,
शांत कराया हताश चित्ता,
रुक्ष जगावर स्त्री हृदयांतिल टाकिल अश्रू एक ! १४
त्या अश्रूच्या शीतलतेनें, भोंवतालची आग जाळणें,
निद्रा घेतां शांत मनानें,
'गोविंदाग्रज' ऐकत राहिल गुंगींतहि हे बोल ! १५

---

# एकनाथ पांडुरंग रेंदाळकर

(मन्दार)

(१८८७–१९२०)

## कवीचें मन

लक्ष्मीचें रमणीय लास्य न कदा तन्मानसा मोहवी ।
दृष्टी लावुनि उन्मनी विचरतो स्वच्छन्द लोकीं कवी ॥
सृष्टींतील न वस्तु एकहि तया मोहांत पाडूं शके ।
मोहानें जरि हांसुनी भुलुनिही कोणीकडे तो भके ॥ १ ॥

आहे जीवित चारुताच कविचें प्रीतींतही गुंगतो ।
होतो बद्ध न त्यांत तो परि, दुरी राहूनही रंगतो ॥
डोले तो रमणीय वस्तु बघुनी हासे समानन्दुनी ।
त्याची दृष्टि परी असे, न कळते, कोणीकडे लागुनी ॥ २ ॥
कान्तेचें स्मित रञ्जवी, भुलवितो त्याला प्रियालाप तो ।
नाना विभ्रम दावितां प्रणयिनी उन्मत्तसा डोलतो ॥
त्या कालींच परी तदीय मन तें अज्ञात कोण्या स्थलीं ।
होतें मग्न ! कुणा कळेल जगिं तद्वृत्ती कुठें लागली ॥ ३ ॥
लोकांना दिसतो तसाच कविचा आचार नाहीं खरें ।
त्याचें गूढ विचारमग्न मन कीं जाणील कोणी बरें ? ॥
सामान्याहुनि तो विचित्र ! कुठुनी अज्ञांस हें आकळे ? ।
हें तत्त्व व्यवहारभिन्न, न जडव्यापारमग्नां कळे ॥ ४ ॥
लोकांना समजे न आंतुनि तसा बाहेर नाहीं कवी ।
भिन्ना दृष्टि तदीय ! सत्य मुशला आणील तो पालवी ॥
त्याचें ज्ञान अतर्क्य ! शक्ति अतुला ! सामान्य नोहे मती ।
गर्वा सोडुनि थोर थोर कविला अत्यादरें वन्दिती ॥ ५ ॥

---

# त्र्यंबक बापुजी ठोमरे

## ( बालकवि )

( १८९१–१९१८ )

### फुलराणी

हिरवे हिरवे गार गालिचे । हरित तृणाच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती । फुलराणी ही खेळत होती
गोड निळ्या वातावरणांत । अव्याज मनें होती डोलत
प्रणयचंचला त्या भ्रूलीला । अवगत नव्हत्या कुमारिकेला !
आईच्या मांडीवर बसुनी । झोंके घ्यावे गावीं गाणीं
याहुनि ठावें काय तियेला । साध्या भोळ्या फुलराणीला ?

× × × ×

पुरा विनोदी संध्यावात । डोलडोलवी हिरवें शेत
तोच एकदां हांसत आला । चुंबुन म्हणे फुलराणीला—
"छानी माझी सोनुकली ती । कुणाकडे ग पाहत होती ?
कोण बरें त्या संध्येंतून । हळुच पाहतें डोकावून ?
तो रविकर का गोजिरवाणा । आवडला अमुच्या राणीनां ?"
लाज लाजली या वचनांनीं । साधी भोळी ती फुलराणी

× × × ×

आंदोलीं संध्येच्या बसुनी । झोंकें झोंके घेते रजनी
त्या रजनीचे नेत्र विलोल । नभीं चमकती ते ग्रहगोल !

जादूटोणा त्यांनीं केला । चैन पडेना फुलराणीला
निजलीं शेतें निजलें रान । निजले प्राणी थोर लहान
अजून जागी फुलराणी ही । आज कशी ताळ्यावर नाहीं ?
लागेना डोळ्याशीं डोळा । काय जाहलें फुलराणीला ?

× × × ×

या कुंजांतुन त्या कुंजांतुन । इवल्याशा या दिवल्या लावुन
मध्यरात्रिच्या निवांत समयीं । खेळ खेळते वनदेवी ही
त्या देवीला ओव्या सुंदर । निर्झर गातो; त्या तालावर—
झुलुनि राहिलें सगळें रान । स्वप्नसंगमीं दंग होउन !
प्रणयचिंतनीं विलीन वृत्ति । कुमारिका ही डोलत होती ।
डुलतां डुलतां दंग होउनी । स्वप्नें पाही मग फुलराणी :

× × × ×

स्वर्भूमीचा जुळवित हात । नाच नाचतो प्रभातवात
खेळुनि दमल्या त्या ग्रहमाला । हळुहळु लागती लपावयाला
आकाशींची गभीर शांति । मंद मंद ये अवनीवरती
विरूं लागलें संशय—जाल । संपत ये विरहाचा काल
शुभ्र धुक्याचें वस्त्र लेवुनी । हर्ष निर्भरा नटली अवनि ।
स्वप्नसंगमीं रंगत होती । तरीहि अजुनि फुलराणी ती

× × × ×

तेजोमय नव मंडप केला । लख्ख पांढरा दहा दिशांला
जिकडे तिकडे उधळित मोतीं । दिव्य वऱ्हाडी गगनीं येती ।
लाल सुवर्णी झगे घालुनी । हांसत हांसत आले कोणी
कुणी बांधिला गुलाबि फेटा । झकमकणारा सुंदर मोठा !

आकाशीं चंडोल चालला । हा वाङ्निश्चय करावयाला
हें थाटाचें लग्न कुणाचें । साध्या भोळ्या फुलराणीचें !

× × × ×

गाउं लागले मंगलपाठ । सृष्टीचे गाणारे भाट
वाजवि सनई मारुतराणा । कोकिळ घे तानावर ताना !
नाचुं लागले भारद्वाज । वाजविती निर्झर पखवाज
नवरदेव सोनेरी रविकर । नवरी ही फुलराणी सुंदर
लग्न लागतें ! सावध ! सारे । सावध ! पक्षी सावध ! वारे !
दंवमय अंत:पट हा फिटला । भेटे रविकर फुलराणीला !

× × × ×

वधूवरांनां दिव्य रवांनीं । कुणी गाइलीं मंगल गाणीं
त्यांत कुणीसें गुंफित होतें । परस्परांचें प्रेम ! अहा तें !
आणिक तेथिल वनदेवीही । दिव्य आपुल्या उच्छ्वासांहीं
लिहीत होत्या वातावरणीं । फुलराणीची गोड कहाणी
गुंगत गुंगत कवि त्या ठायीं । स्फूर्तीसह विहराया जाई
त्यानें तर अभिषेकच केला । नवगीतांनीं फुलराणीला !



# शंकर केशव कानेटकर

( गिरीश )

( १८९३ )

## ‘ अनाथ बालिकाश्रमांतील आरंभींची खोली ’

( जाति—प्रणयप्रभा )

मन किती बघुनि तुज कौतुकतें
अभिमानें हृदया ये भरतें ॥ ध्रु० ॥

तरंगिणीची बघुनि भव्यता
जळविस्तारीं मधुर दिव्यता
अवलोकाया उगमरम्यता
दृष्टि झणीं मागें फिरते १

किती पसरलीं किरणें शीतल
वृक्षलतांना करुनी निर्मळ
जींतुन परि तीं आलीं कोमल
तीस पहाया मन वळतें २

भक्तिरसाची जणुं अधिराणी
दूर पसरली अभंगवाणी
जींतुन, वीणा ती निजनयनीं
पहावया मन उत्सुकतें ३

कार्य-भव्यता तुज भंवतीची
पाहुन उठती हृदयीं वीची
सहानुभूती सादर मनिंची
पहावया तुज आतुरते ४

---

# प्रो. वासुदेव गोविंद मायदेव

( वनमाली )

( १८९४ )

## ‘ भास ! ’

( जाति—मुद्रिका )

मी उठुन सकाळीं कामाला लागतें
पण वेळोवेळीं भासे मम चिमणें मज बाहतें !
मी भाजी चिरतां दचकोनी थांबतें
करिं हळुच धरोनी पातें मज गमे बाळ पाहतें !
मी थकुन दुपारीं धरणीवर टेकतें
निश्चितपणें तइं वाटे मजजवळ बाळ घोरतें !
मी कधीं दुपारीं डाळ गहूं निवडितें
खुडबूड कुठें तरि चाळू बाळाची मज वाटते !

मी कधीं देउळिं प्रदक्षिणा घालितें
भुरभूर माझिया मागें पण गमतें कुणी चालतें !
मी सायंतनिं जेधवां वात लावितें
मम चिमणें कर जोडोनी मजजवळ उभें भासतें !
या भासानें तर ऊर कसें दाटतें
नशिबीचें सुख संपोनी गेलेंसें मज वाटतें !

---

# प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन

( माधव ज्यूलियन् )

( १८९४ )

## आमुची मायबोली

मराठी असे आमुची मायबोली जरी आज ती राजभाषा नसे ;
नसे बाह्य ऐश्वर्य या माउलीला, यशाची पुढें थोर आशा असे ;
न मातब्बरी पञ्चखण्डान्तरीं ती जरी मान्यता पावली इंग्रजी !
भिकारीण आई जहाली म्हणूनी कुशीचा तिच्या तीस केवीं त्यजी ?
जरी मान्यता आज हिन्दीस देई उदेलें नवें राष्ट्र हें हिंदवी,
दिलाचा मराठा मराठीस वंदी हिची जाणुनी योग्यता थोरवी;
असो दूर पेशावरीं उत्तरीं तो, असो दख्खनीं दूर तंजावरीं,
मराठीच माझी म्हणे मायबोली प्रतिष्ठापुनी मूर्ति अभ्यन्तरीं.

मराठी असे आमुची मायबोली जरी भिन्नधर्मानुयायी असूं,
सहिष्णुत्व अंगीं पुरें बाणलेलें, हिच्या एक ताटांत आम्ही बसूं;
हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडूं, वसे आमुच्या मात्र हृन्मन्दिरीं
जगन्मान्यता हीस अर्पूं प्रतापें, हिला बैसवूं वैभवाचे शिरीं !
हिच्या लक्तरांची असे लाज आम्हां, नका फक्त पाहूं हिच्या लक्तरां;
हिचें कुद्रती रूप लावण्य देखा, जयाचा रसज्ञामधीं अस्करा:—
न घालूं जरी वाङ्मयांतील उंची हिरे मोतियाचे हिला दागिने,
मराठी असे आमुची मायबोली, कशाला बढाई, कशाला जिणें ?
करंटी दरिद्री नसे जन्मतां ही हिची थोर सम्पत्ति कालोदरीं
पचेना, उपेक्षेमुळें राहिलेली, झणीं तीस बाहेर काढूं तरी !
कशाला हवी लूट ? देतील भाषा जगाच्या हिला वाढती खण्डणी—
मराठी असे आपुली मायबोली ! मराठे, झिजूं या हिच्या कारणीं !

---

# यशवंत दिनकर पेण्ढरकर

( यशवंत )

( १८९९ )

## " आशीर्वाद "

तुज द्याया आशीर्वादा मी उचलूं केंवि हात ?
पुष्पिता लता उद्यानीं
घालितां तिला मी पाणी
तेथल्या तेथ ती होई अविलम्बें भस्मसात
करिं कांचनरज हो वाळू
मग केंवि तुला कुरवाळूं ?
जाईल काळवण्डूनी तव कांती जन्मजात
जरि वाटे तुज कवळावें
मस्तका तुझ्या हुंगावें
परि उधाण वात्सल्याचें मी हटवी आंत आंत
नभिं नक्षत्रांची शोभा
धरि मी न पहाया लोभा
निखळतील मम नजरेनें, भय नांदे मानसांत
म्हणुनिया-जरी मी वाञ्छी—
आरती न धरि नयनांची

मग अंतर्मुख ती जाळी जरि जीवा स्नेहवात !
उल्हास उकळतो जेथें
सुखपूर्ति खिदळते जेथें
प्रगटून कशाला तेथें मी पसरूं काळरात ?
तूं सजसी व्योमविहारा
जा विहङ्गमा परभारा
अणु-अणूंत दूषित माझ्या वास्तव्यें येत वात
माङ्गल्य मूर्त होवोनी
दिग्विजयें ये परतोनी
अस्पृश्य तोंवरी येथें मी बसतों बघत वाट
थबथबून ये अमृतानें
आणि त्या तुझ्या स्पर्शानें
दे तीर्थरूपता मातें सांप्रत जी शद्बमात्र.



# ‘सुमन-हार’

## भाग पहिला

### तुकाराम

( १६०८–१६४९ )

मराठी काव्यांत आपल्या अभंगवाणीनें स्वतःला अभंग स्थान प्राप्त करून घेणाऱ्या या महान् भगवद्भक्ताचा जन्म देहू या गांवीं झाला. यांचा वडिलार्जित धंदा वाण्याचा होता. तुकारामांनींही कांहीं काळपर्यंत व्यापार केला; परंतु लवकरच त्यांचें मन या प्रापंचिक गोष्टींस कंटाळलें व ते पूर्ण विरक्त बनले. यांचें उपास्य दैवत विठोबा हें होय.

तुकाराम बोवांचें सर्व काव्य अभंग वृत्तांतच आहे. ज्ञान, भक्ति, नीति, वैराग्य वगैरे विविध विषयांवर यांचे अधिकारपूर्ण अभंग आहेत. यांच्या अभंगांची भाषा सोपी, सरळ, भक्तीनें भरलेली, हृदयास भिडणारी व प्रासादिक अशी आहे. हे जरी स्वतः पंडित नव्हते तरी यांच्या अभंगांत वेद व उपनिषदें वगैरेंतील उदात्त तत्त्वांचा फारच सुंदर व सोप्या रीतीनें ऊहापोह केलेला आढळतो. हे थोर भगवद्भक्त सन १६४९ मध्यें वैकुंठवासी झाले.

उताऱ्यांतील यांचे अभंग अनुक्रमें (१, २) संत (३) दुर्जन (४) आत्महित (५) दया (६) क्षमा (७) जनाचार (८) दृष्टान्त (९) उपदेश (१०) करुणा या विषयांवर आहेत.

### टीपा

अभंग १:—वरो = पुष्कळ. साट = मोबदल्यांत मिळालेला माल.

अभंग ३:—सुनें = कुत्रें.

अभंग ५:—(१) प्राणिमात्रांचें रक्षण आणि निर्दयांचा नाश म्हणजेच दया; (२) नीतीचा विचार न करतां भलतेंच करणें तें पाप; उन्मत्त असेच वागतात. आटी = खटखट; दगदग; त्रास.

अभंग ६:—आपसया = आपोआप.

(३) क्षमा हें सर्वांचें हित आहे. ती निरंतर खुशाल धरावी.

अभंग ८:—(२) भाग्यवंत मनुष्य ती पैसे खर्च करून विकत घेतात.

पारणें = उपास सोडण्याच्या वेळीं केलेलें भोजन

अभंग ९:—पवीजे = पावतो. जाणिव = ज्ञान.

(६) नुसत्या ज्ञानाची युक्ति काय कामाची? भावानें मुक्ति मिळेल.

अभंग १०:—आपणाऐसा = आपल्याप्रमाणें (लक्ष्मीपती; श्रीमान्)

---

## २ वामन पंडित

### (१६१८–१६७३)

या कवींच्या जन्ममृत्युकालाविषयीं अजून बराच वाद आहे. तथापि हे सन १६१८ च्या सुमारास जन्मले असावे असा तर्क आहे. हे सातारा जिल्ह्यांतील कोरेगांव कुमर्टे येथील जोशी होत. यांनीं उत्तम प्रकारें शास्त्राध्ययन करून पुष्कळ शास्त्रीपंडितांस वादविवादांत जिंकलें. प्रथम यांनीं पुष्कळ संस्कृत काव्यरचना केली; परंतु नंतर रामदास स्वामींच्या सांगण्यावरून मराठींत पद्यरचना करावयास सुरवात केली असें म्हणतात.

पंडितांची काव्यरचना कोमल असून भाषा प्रौढ, रसाळ व श्रवणमनोहर असते व तींत स्वभावोक्ति व ओजस्विता हे गुण भरपूर आहेत. यांच्या प्रासादिक श्लोकांवरून यांना 'सुश्लोक वामनाचा' अशी कीर्ति मिळाली. यांच्या कवितांतील सुंदर यमकें पाहून रामदासस्वामी यांना 'यमक्या वामन' असें म्हणत असत. यथार्थदीपिका व निगमसार हे दोन काव्यग्रंथ व भागवत, भारत, रामायण वगैरेंतील निरनिराळ्या प्रकरणांची व भर्तृहरीच्या शतकांची श्लोकबद्ध रचना मिळून वामनांची बरीच कविता आहे.

हा उतारा महाभारतांतील जयद्रथवधावर आहे. अभिमन्यु लढाईत पडला असतां त्याच्यावर जयद्रथानें लत्ताप्रहार केला म्हणून 'उद्यां सूर्य अस्तास जाण्यापूर्वी मी जयद्रथास ठार मारीन' अशी अर्जुनानें प्रतिज्ञा केली. ती श्रीकृष्णानें शेवटास नेली अशी कथा या उताऱ्यांत आहे.

## टीपा

पूर्वज = अर्जुन ( वैशंपायन ऋषि जनमेजय राजास ही हकीकत सांगत आहेत. ) हुतवहीं = अग्नींत. जथुनि = एकत्र होऊन. वारणाला = निवारण्यास. सैंधव = सिंधूदेशचा. शरव्रात = बाणांचा समुदाय. सव्यापसव्यकृतसायकतांडवानें = दोन्ही हातांनीं बाण सोडणाऱ्या ( अर्जुनानें ). वाह = घोडा. आधोरण = महत. अपार्थे = पाण्याकरितां. युग = जूं. घोटक = घोडा. संजोगिले = जोडिले. हयचतुष्टय = शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प व बलाहक हे अर्जुनाच्या रथाचे चार घोडे. कैटभारी = कैटभ दैत्याचा शत्रु ( श्रीकृष्ण ). शतक्रतुसुत = इंद्राचा मुलगा ( अर्जुन ). धाकलास = भ्यालास. निकाम = पूर्णपणें. धृतराष्ट्रज = कौरव. जाला = पुनः जन्मला. खटाळी = थट्टा. लक्ष = नेम. जगच्छेखर = श्रीकृष्ण.

---

## ३ मुक्तेश्वर

( १५९९–१६४९ )

महाराष्ट्रांत आजपर्यंत पुष्कळ कवि होऊन गेले, परंतु खऱ्या कवित्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास त्या सर्वांत मुक्तेश्वरांची योजना प्रमुख स्थानीं करणें चुकीचें होणार नाहीं. त्यांची आज उपलब्ध असलेली कविता थोडी आहे, परंतु ती इतकी सरस आहे कीं मराठींतील उत्तम कवितेचा नमुना जर कोणास पाहावयाचा असेल तर तो त्याला मुक्तेश्वरांच्या महाभारतांत सांपडेल. पैठणचे प्रख्यात सत्पुरुष कवि एकनाथ स्वामी हे मुक्तेश्वरांचे मातामह होत. मुक्तेश्वरांचें संस्कृत भाषेचें अध्ययन फारच उत्तम प्रकारचें झालें होतें. आपल्या अंगीं असलेल्या कवित्वशक्तीचा उपयोग करून मुक्तेश्वरांनीं भारत, रामायण व भागवत वगैरे ग्रंथांचें मराठींत कविताबद्ध भाषांतर केलें. भारतापैकीं आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक इतकीं त्यांचीं पर्वें प्रसिद्ध आहेत. यांची कविता प्रासादिक, प्रौढ, रसाळ व सृष्टिसौंदर्ययुक्त असून नानाप्रकारचे अलंकार व रस तींत ठिकठिकाणीं आहेत. ओवी छंदांतील यांची काव्यरचना इतकी सुंदर, रसाळ व ओजस्वी असते कीं त्या बाबतींत हे ज्ञानेश्वरांशीं बरोबरी करूं शकतात. यांच्या जन्म व निधनकालासंबंधीं बराच वाद आहे.

हा उतारा रामायणांतील आहे. त्यांत भरत व राम यांच्या भेटीचें वर्णन आहे.

## टीपा

श्रावितां = ऐकतां. मात = गोष्ट; खबर. दिठी = दृष्टी. भाविलें = मानिलें. दंदी = द्वेष धरणारा. नोसडी = न सोडी. वाड = पुष्कळ; अतिशय. काळी-रमण = शंकर. धरबळी = बळी (बैल) आहे वाहन ज्याचा असा (शंकर). माळी = माला धारण करणारा. मवाळी = मृदु. शेषतूळीं = शेषाच्या बिछान्यावर. सुतारी = चांगल्या तरणाऱ्या. नृपें = रामानें.

---

## ४ मोरोपंत रामचंद्र पराडकर

(१७२९-१७९४)

या प्रसिद्ध कवीचा जन्म सन १७२९ मध्यें झाला. यांचे वडील रामचंद्रपंत हे बाबुजी नाईक बारामतीकर यांच्याकडे कारकून होते. मोरोपंतांनीं संस्कृत भाषेचा फारच उत्तम अभ्यास करून त्यांत प्रावीण्य संपादन केलें होतें.

पंतांची काव्यरचना विविध प्रकारची व विपुल आहे. भारत, भागवत, हरि-वंश, कृष्णविजय, शिवाय रामायणें, इतर आख्यानें व पद्यें मिळून यांची काव्य-रचना मराठींतील कोणत्याही कवीपेक्षां जास्त आहे.

पंतांची भाषा प्रौढ व व्याकरणशुद्ध परंतु संस्कृत–प्राकृत–मिश्रित अशी आहे, व त्यामुळें कांहीं कांहीं ठिकाणीं जराशी क्लिष्ट झाली आहे. परंतु यांची वाणी रसाळ व प्रौढ असल्याकारणानें व तींत पुष्कळ शब्दालंकार व अर्था-लंकार ठिकठिकाणीं विखुरलेले असल्याकारणानें ती सुसंस्कृत वाचकांचीं मनें चटकन् आपलेकडे ओढून घेते.

हा उतारा महाभारतांतील उद्योगपर्वांतील आहे. कौरवपांडवांचा समेट करण्याचा प्रयत्न निष्फळ झाल्यावर श्रीकृष्ण पांडवांकडे जातांना कर्णास रथांतून घेऊन गेले व त्याला कौरवांचा पक्ष सोडून पांडवांस मिळण्याविषयीं उपदेश करूं लागले. त्यांना कर्णानें दिलेलें उत्तर खालील उताऱ्यांत आहे.

## टीपा

कानीन = कन्यादशेंत झालेला. वदान्य = उदार. वनद = मेघ. अजातारी = धर्मराज. अभ्रात्या = भाऊ नव्हे अशाला सुद्धां. दर = भीति. सितच्छदा = शुभ्रपंख असलेला. सुखगा = हंसपक्ष्याला. भटकरगें ( लोहें ) = वीराच्या हातांतील ( शस्त्रानें ). स्पर्शमणि = परिस. परिहृत–सर्व–नत–नराघे = सर्व भक्तांचीं दुःखें ज्यानें हरण केलीं आहेत अशा ( श्रीकृष्ण ). नरकविच्या = श्रेष्ठ मनुष्याच्या. तल्प = शय्या. गद = रोग. कल्पनग = कल्पवृक्ष. अवसानीं = शेवटीं. क्षत्र = क्षत्रियांचा समूह. सत्यागा = ( सति + आगा ) द्रौपदीचा अपराध. रणाजिर = रणांगण. सुपदेश = ( सु + पद + ईश ) राजे. कनकमरकत = सोनें व पाच यांचा. नग = दागिना.

---

## ५ रघुनाथ पंडित

हे कवि सतराव्या शतकांत होऊन गेले, असा समज आहे. या पलिकडे या कवीविषयीं विशेष कांहीं माहिती उपलब्ध होत नाहीं. संस्कृतांतील नैषध काव्याच्या आधारें या कवीनें लिहिलेला 'नलदमयंती-स्वयंवराख्यान' हा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांतील भाषा सुंदर असून यमक-अनुप्रासादि शब्दालंकार व उपमा, उत्प्रेक्षा वगैरे अर्थालंकार यांनीं युक्त अशी आहे.

इंद्राचा दूत म्हणून नलराजा दमयंतीकडे जाऊन तिचें मन वळविण्याचा प्रयत्न करितो. परंतु त्यांत त्याला यश येत नाहीं. स्वयंवरमण्डपांत नलरूपधारी देवांस पाहून दमयंती त्यांची प्रार्थना करते. दमयंतीचें नलावरील निश्चल प्रेम पाहून देव प्रसन्न होतात व तिला वर देऊन जातात असा या उताऱ्यांतील सारांश आहे.

## टीपा

हेजीब = दूत. साक्षेप = अगत्य. विमानदेशीं = आकाशांत. सहस्राक्ष = इंद्र. अवंचक = प्रामाणिक. स्वाराज्य = स्वर्गाचें राज्य. बहुलोचन = यावरून वरण्यास अयोग्य असें ठरविलें. सजणे = सखे. मध्यस्थ = पूर्व दिशेचा

स्वामी इंद्र व दक्षिण दिशेचा स्वामी यम यांच्यामधील आग्नेय दिशेचा स्वामी अग्नि. हा स्वयंवरमंडपांत इंद्र व यम यांच्या मध्यें बसला होता. साहील कोण...तेज याचें = या ओळींतील असह्य तेजावरून हा वरण्यास अयोग्य असें सुचविलें. आशा = दिशा. घनकांती = यावरून वरण्यास अयोग्य असें सुचविलें. आधार हाच...जीवनाचा = या श्लोकांतील विशेषणांवरून वरुणास बहुव्यापृतत्वावरून स्वस्त्रीशीं सुद्धां बोलण्यास सवड सांपडत नाहीं म्हणून तो अयोग्य असें सुचविलें आहे. होतील...नळरूपधारी = या कवितेंत, इंद्र, वरुण, यम व अग्नि यांच्या अंगीं असलेले सर्व गुण नलाच्या अंगीं आहेत म्हणून तूं त्यासच वर असा अभिप्राय आहे. मस्त = पुष्कळ. बाला = बापाला. दूर्वादळीं-कदलिबंध-मधूकमाळा = केळीच्या दोरांत गुंफलेली दुर्वानीं युक्त अशी मधूक ( दुपारी ) पुष्पांची माळा.

# सुमन-हार

## भाग दुसरा

### १ ज्ञानेश्वर

( १२७५-१२९६ )

महाराष्ट्र संतकवींची गणना करतांना ज्या भावंडांचीं नांवें निघालीं असतां प्रत्येकाचें मन भक्तियुक्त प्रेमानें भरून येतें, त्यांत महान् भगवद्भक्त साधु ज्ञानेश्वर हे प्रमुख होत. यांच्या वडिलांचें नांव विठ्ठलपंत व आईचें नांव रुक्मिणीबाई. अपत्याभावीं विठ्ठलपंतानीं काशीस जाऊन संन्यासाश्रम स्वीकारला. पुढें गुरुजींच्या आज्ञेवरून पुन्हां त्यांनीं गृहस्थाश्रमांत प्रवेश केला. त्यांस निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई अशीं चार अपत्यें झालीं. ज्ञानदेवांचा जन्म आळंदी येथें शके ११९७ श्रावण व. ८ स झाला. हीं सर्व भावंडें लहानपणापासून ज्ञानी, विरक्त व विठ्ठलभक्त अशीं होतीं.

ज्ञानेश्वरांनीं भगवद्गीतेवर 'भावार्थदीपिका' या नांवाचा एक सुंदर ओवीबद्ध टीकात्मक ग्रंथ लिहिला. यालाच 'ज्ञानेश्वरी' असें म्हणतात. त्यांची भाषा प्रासादिक व मधुर असून ठिकठिकाणीं उपमा, दृष्टांन्त वगैरे अलंकारांनीं भरलेली आहे. ज्ञानेश्वरीशिवाय अमृतानुभव, स्वात्मानुभव, पंचीकरण व पांसष्टी या नांवाचे त्यांचे भक्ति-ज्ञान-वैराग्यपर ग्रंथ व शिवाय पुष्कळसे अभंग प्रसिद्ध आहेत.

या उताऱ्यांत भारताचा मोठेपणा वर्णन केलेला आहे. निरनिराळ्या उपमा, रूपकें, उत्प्रेक्षा वगैरेंनीं उताऱ्यास फारच शोभा आली आहे.

#### टीपा

प्रमेयमहानिधी = सिद्धांतसमुद्र. जिव्हार = जीवप्राण. अविष्करोनी = व्यक्त करून. ग्रंथगुरुवती = ग्रंथांचा राजा. आवो = मोठेपणा. पोखलें = पुष्ट झालें; वाढलें. नाना = किंवा. निवाड = स्पष्ट. सानीव = लहान.

## २ रामदास

### ( १६०८–१६८१ )

महाराष्ट्रांत हिंदुपदपातशाही स्थापन करणारा राजा शिवाजी याचे हे गुरु होत. यांचें मूळ नांव नारायण सूर्याजीपंत ठोसर. लग्नाच्या वेळीं मंगलाष्टकें म्हणतांना ब्राह्मणांनीं ‘ सावधान ’ म्हटलेलें ऐकून सावध होऊन, घर सोडून हे तीर्थयात्रेस बाहेर पडले, व पंचवटींत राहून त्यांनीं श्रीरामचंद्राची कडकडीत उपासना केली म्हणून यांस पुढें ‘ रामदास ’ असें म्हणूं लागले. हे लहानपणापासून विरक्त होते. शिवाजी महाराजांनीं आपलें सर्व राज्य यांस अर्पण केलें असतां तें त्यांस परत करून आपल्या गुरुत्वाची खूण म्हणून “मराठ्यांचा झेंडा” भगवा असावा आणि कनिष्ठ वर्गांतील लोकांनीं नमस्काराच्या वेळीं ‘ रामराम ’ म्हणावें ” असें त्यांनीं ठरविलें.

यांचे दासबोध, समास आत्माराम, मनाचे श्लोक, रामायण वगैरे ग्रंथ व पुष्कळ अभंग प्रसिद्ध आहेत. पैकीं दासबोध व मनाचे श्लोक हे फारच लोकप्रिय ग्रंथ होत. यांची वाणी प्रेमळ व प्रासादिक असून भाषा साधी, सावेश व परिणामकारक अशी आहे. त्या काळीं महाराष्ट्रांतील लोकांचीं मनें स्वराज्य व स्वधर्म यांजकडे वळविण्यास यांच्या वाणीचा फारच उपयोग झाला.

हा उतारा रामायणांतील युद्धकांडापैकीं आहे. रावणवधानंतर सीतेनें जें अग्निदिव्य केलें, त्याचें यांत वर्णन आहे.

### टीपा

दाटणी = गर्दी. तूर = वाद्य. रीस = अस्वल. विरंची = ब्रह्मदेव. अवस्था = चिंता, काळजी. चीर = वस्त्र. कपीवाहिनी = वानरसैन्य.

---

## ३ श्रीधर

( १६७८–१७२९ )

संस्कृत भाषेंतील निरनिराळ्या ग्रंथांचा सोप्या मराठी कवितेंत आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस परिचय करून देणारे हेच कवि होत. यांचें मूळ गांव नाझरें; परंतु लहानपणापासून हे विरक्त असल्या कारणानें ते पंढरपूर येथें राहत असत. रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप, शिवलीलामृत, जैमिनी अश्वमेध वगैरे बरेच ग्रंथ यांनीं लिहिले आहेत. यांची भाषा सोपी परंतु प्रासादिक असते. चटकदार व मनोवेधक वर्णनें करण्यांत श्रीधरांचा हातखंडा आहे.

हा उतारा शिवलीलामृतांतील आहे. यांत शिवयोगी नांवाचा एक संन्याशी भद्रायू नांवाच्या एका राजकुमारास राजनीतीचा उपदेश करीत आहे. रामदासस्वामींनीं संभाजी राजास पाठविलेल्या पत्रांतील राजनीतीचा उपदेश व हा शिवयोग्याचा उपदेश यांत पुष्कळ साम्य दृष्टीस पडेल.

### टीपा

वैखरी = वाणी. पृष्ठी = पाठ. आभरण = अलंकार.

---

## ४ मोरो गणेश लोंढे

( १८५४–१९२० )

पेण तालुक्यांतील वरसई या गांवीं हे कवि जन्मले. यांचें मराठी व इंग्रजी प्राथमिक शिक्षण पेण येथें झालें. वयाच्या १६ व्या वर्षी शिक्षण सोडून फक्त ६ रुपये पगारावर यांनीं शिक्षकाची नोकरी धरली. यांनीं विविध विषयांवर पुष्कळ कविता लिहिली आहे. यांची कविता साधी, सरळ, व्याकरणशुद्ध व नीतिबोधपर अशी असते.

ऐतिहासिक स्थलांचें अवलोकन करण्यास कोणीही, मनांत कोणतेही हेतु धरून जावो, ते त्याचे हेतु पूर्ण झालेच पाहिजेत, असें कवीनें या कवितेंत सांगितलें आहे. ऐतिहासिक स्थलांविषयींचें कविच्या मनांतील प्रेम या कवितेंत स्पष्ट रीतीनें दृग्गोचर होतें.

## टीपा

मातिलता = बुद्धिरूपी वेल. हर्म्य = राजवाडा. विधु = चंद्र. हिरकणी = या नांवाचा रायगडावर एक बुरुज आहे, त्या ठिकाणीं तुटलेल्या कड्यामुळें रस्ता अतिशय बिकट असतां हिरकणी नांवाची एक गौळण तो कडा उतरून गेली. शिवाजी महाराजांनीं त्या ठिकाणीं एक बुरुज बांधला व त्याला तें नांव दिलें, अशी आख्यायिका आहे.

---

## ५ गंगाधर रामचंद्र मोगरे

(१८५७–१९१५)

हे कवि शिरगांव येथें जन्मले. यांचें इंग्रजी शिक्षण एल्फिन्स्टन् हायस्कूलांत प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें. परंतु शरीरप्रकृति सुदृढ नसल्या कारणानें पुढें त्यांस शिक्षणक्रम सोडून द्यावा लागला. पहिल्यानें बँकेंत व नंतर 'रॉयल एशियाटिक सोसायटी' च्या ग्रंथसंग्रहालयांत यांनीं कारकुनाची नोकरी केली.

यांना कविता करण्याचा नाद मराठी शाळेंत असतांनाच लागला. यांची कविता साधी, सरळ व प्रसन्न असते. यांनीं बाणकवीच्या कादंबरीचें आर्यावृत्तांत 'आभिनव–कादंबरी' या नांवाचें केलेलें भाषांतर प्रसिद्ध आहे. यांच्या विविध कविता 'मोगऱ्यांचीं फुलें' या नांवाच्या गुच्छांतून प्रासिद्ध आहेत.

या उताऱ्यांत सह्याद्रि, जवळपासचे रम्य प्रदेश, नद्या, किल्ले इत्यादिकांचें सुंदर वर्णन आहे.

## टीपा

विंध्याद्रिव्रत......रवीच्या रथा = एकदां मेरू पर्वताशीं स्पर्धा करण्याकरितां विंध्याद्रि वाढत जाऊन आकाशाशीं भिडला. त्यामुळें सूर्याच्या गतीस रोध झाला. तेव्हां सर्व देवांनीं विंध्याद्रीचे गुरु अगस्तिमुनि यांना विनंति करून त्यांस दक्षिणेस पाठविलें. गुरूस पाहतांच वंदन करण्याकरितां म्हणून विंध्याद्रि खालीं वांकला. तेव्हां 'मी परत येईपर्यंत असाच पडून रहा' असें सांगून अगस्ति मुनि दक्षिणेकडे गेले अशी कथा आहे. त्या कथेस अनुलक्षून

हें वर्णन आहे. मार्गण = बाण. कोठें भार्गव......मार्गे पळे = पूर्वी समुद्र सह्याद्रिच्या पायथ्याशीं होता; परंतु परशुरामानें आपल्या बाणानें त्यास मार्गे हटवून ही परशुरामभूमि ( कोंकण ) निर्माण केली व ती ब्राह्मणांस दान केली, अशी कथा आहे.

त्याचा मारहि......मुलींचे लळे = त्या समुद्राच्या लाटांचे प्रहार सहन करूनही आपल्या मुलींचे ( नद्यांचे ) लाड हा पर्वत पुरवितो. ज्योतिः-स्वरूपें = लिंगरूपानें उ० त्र्यंबकेश्वर. हिमालयसुता = पार्वती. बौद्धादि-कांच्या कृती = लेणीं ( वेरूळ वगैरे ठिकाणचीं ). सप्तशृंग = नाशिक जिल्ह्यांत वणी तालुक्यांत या नांवाचा एक डोंगर आहे.

शिवा = भालू. जावळीचा कवी = रामदास.

---

## ६ नारायण वामन टिळक

( १८६५–१९१९ )

मराठी कवींत हे 'फुलामुलांचे कवि' या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांनीं संस्कृत व इंग्रजी काव्याचा चांगलाच अभ्यास केला होता. धर्मांतर केलें असूनही यांचीं स्वदेशप्रीति उज्ज्वल प्रतीची आहे. यांचीं सुशीला, वनवासी फूल, बापाचे अश्रु वगैरे खंडकाव्यें आहेत. यांच्या स्फुट कवितांचा एक भाग प्रसिद्ध झालेला आहे. टिळकांची कविता साधी, सहजसुंदर, सुबोध व प्रासादिक असते. निसर्गांतील सुंदर देखाव्यांचें टिळकांनीं केलेलें वर्णन अतिशय श्रवण-मनोहर असतें. स्वभावोक्ति अलंकार वठविण्यांत त्यांचा हातखंडा होता. कवि या नात्यानें टिळकांचा दर्जा पुष्कळच उच्च आहे. 'खरें काव्य म्हणजे कवीच्या अंतःकरणांत उत्पन्न होणाऱ्या विचारलहरींचा ओघ' अशी काव्याची व्याख्या केली असतां ती टिळकांच्या कवितेस योग्य प्रकारें लागू पडते.

या उताऱ्याची मूळ कल्पना येणेंप्रमाणें आहे. "पुष्कळ लोकांना असें वाटतें कीं, कवि एकांतांत, निवृत्तावस्थेंत असला, आणि त्याला नुसतें फुलें गुंफावयाचें काम असलें म्हणजे तो उत्कृष्ट काव्यें करील. पण संसार, तत्संबंधीं

चिंता व श्रम हें सारें आनंददजनक व स्फूर्तिदायक आहे. कारण आनंद व स्फूर्ति यांचें मूळ बाहेर नसून मनुष्याच्या अंतःकरणांत आहे, व त्याचा खरा विस्तार प्रवृत्तावस्थेंतच होत असतो, असें समजणाऱ्या या कवीचें म्हणणें निराळें नसून, तेंच तो या कवितेंत विशद करून दाखवीत आहे."

---

## ७ कृष्णाजी केशव दामले

## ( केशवसुत )

( १८६६–१९०५ )

'मराठी काव्यांतील नव्या युगाचे प्रवर्तक' या नांवानें यांची प्रसिद्धि आहे. मोरोपंती काव्याचें मराठी कवितेला असलेलें 'पंडिती' वळण यांनींच पार बदलून तिला स्वतंत्र केली. यांची स्फुट कविता बरीच असून ती 'केशवसुतांची कविता' या नांवानें प्रसिद्ध आहे. यांच्या कवितेंतील मुख्य गुण कल्पकता व ओज हे होत. यांच्या भाषेंत नादमाधुर्य कमी असलें तरी ती कंटाळवाणी न वाटतां स्फूर्तिदायक व मनोरंजक वाटते. यांची कविता विषय-वैचित्र्य व उत्कट भावना यांनीं नटलेली आहे. हे 'केशवसुत' या नांवानें प्रसिद्ध आहेत.

परमेश्वरानें दिलेला मनुष्यजन्म स्वतःच्या सुखोपभोगाकरितां नसून आपल्या देशबांधवांच्या उपयोगी पडण्याकरितां आहे. तेव्हां प्रत्येकानें श्रम हाच देव व परार्थ हाच धर्म मानून आचरण करावें आणि आपल्या उदाहरणानें दुसऱ्यांच्या हृदयांत स्फूर्ति उत्पन्न करावी, हीच या उताऱ्यांतील मुख्य कल्पना आहे.

---

## ८ श्रीमती लक्ष्मीबाई टिळक

( १८७० )

सुप्रसिद्ध कवि नारायण वामन टिळक यांच्या या पत्नी होत. महाराष्ट्रांत आज जीं कांहीं कविकुटुंबें आहेत, त्यांत टिळकांच्या कुटुंबाचा उल्लेख प्रामुख्यानें केला पाहिजे. श्रीमती लक्ष्मीबाईची भाषा मधुर व सुबोध असून निरनिराळ्या कल्पनांनीं नटलेली असते.

ता. ९।५।१९१९ रोजीं कविवर्य नारायण वामन टिळक वारले. ता. ५।८।१९१९ रोजीं श्रीमती लक्ष्मीबाईचा नातू नारायण हा जन्मला. या नातवंडाकडे पाहून लक्ष्मीबाईचे डोळे भरून आले. त्या वेळेस त्यांनीं ही कविता लिहिली.

---

## ९ डॉ. काशिनाथ हरि मोडक

## ( माधवानुज )

( १८७२–१९१७ )

या कवींचा जन्म सुधागड तालुक्यांतील पडघवली या गांवीं सन १८७२ मध्यें झाला. शाळेंत शिकतांना गणित विषय थोडासा कच्चा असल्या कारणानें प्रवेशपरीक्षेंत दोन वेळ अपयश आल्या कारणानें मेडिकल् स्कूलमध्यें यांनीं नांव दाखल केलें, व सन १८९४ मध्यें डॉक्टरीच्या परीक्षेंत उत्तम रीतीनें यश मिळविलें. पुढें अहमदनगर जिल्ह्यांत दुष्काळकामावर निरनिराळ्या ठिकाणीं नोकरी केल्यावर सन १८९९ मध्यें त्यांनीं स्वतंत्र धंदा सुरु केला. इंग्रजी कवींच्या काव्याशीं यांचा उत्तम परिचय झालेला होता. यांची काव्यरचना सोपी, सरळ व तात्त्विक अशी असते. यांच्या कवितांचा संग्रह ‘ माधवानुज ’ या नांवानें प्रसिद्ध झालेला आहे.

या कवितेंतील कल्पना ‘ Writing on Sand ’ या इंग्रजी कवितेवरून सुचली असावी. एकानें समुद्राच्या वाळवंटावर आपलें नांव लिहून ठेविलें; परंतु लवकरच एक लाट आली आणि तें नांव साफ धुवून गेलें, त्यावरून ‘ दृश्य गोष्टी अशाच क्षणभंगुर आहेत, त्या नष्ट झाल्या तर शोक करणें उचित नव्हे ’ असा सिद्धांत या कवितेंत सांगितला आहे.

---

## १० विनायक जनार्दन करंदीकर
## ( विनायक )
## ( १८७२–१९०९ )

मराठी कवितेस ‘ राष्ट्रीय ’ वळण जर कोणीं प्रथम लाविलें असेल तर तें विनायकानेंच होय. थोडेंसें इंग्रजी शिक्षण झाल्यावर यांनीं पोलीस खात्यांत नोकरी धरिली, परंतु यांच्या मनास त्यांत सुख न वाटल्या कारणानें त्यांनीं ती लवकरच सोडून दिली. सन १९०५–०६ सालच्या महाराष्ट्रांतील खळबळीचा यांच्या भावनाप्रधान मनावर अतिशय परिणाम होऊन ‘ हत-भागिनी ’ ‘ शिवराजदर्शन ’ ‘ महाराष्ट्रलक्ष्मी ’ अशा प्रकारच्या कविता जन्मास आल्या. यांनीं ‘ प्रभावती ’ या नांवाचें एक नाटकही लिहिलें आहे. यांचा कवितासंग्रह ‘ विनायकाची कविता ’ या नांवानें प्रसिद्ध आहे.

यांच्या कवितेची भाषा सोपी परंतु भावनाप्रधान अशी आहे. तींत नटवेपणा मुळींच आढळत नाहीं.

एकदां कवि एकांतांत फिरत असतां त्याला सुवास आला. हा वास कसला याचा शोध लावण्याचा कवीनें पुष्कळ प्रयत्न केला, अनेक तर्क केले, परंतु व्यर्थ ! शेवटीं केशवसुतांप्रमाणें अज्ञात गोष्टींचा शोध लावून त्यांतील तत्त्व हुडकून काढण्याची आपल्यांत शक्ति नाहीं, याबद्दल कवीस विषण्णता वाटली. ती त्यानें या कवितेंत व्यक्त केली आहे.

---

## ११ भास्कर रामचंद्र तांबे
## ( १८७४ )

या कवींचा जन्म ग्वाल्हेर संस्थानांत मुगावली या गांवीं झाला. यांचें मराठी व इंग्रजी शिक्षण देवास व उज्जेन येथें झालें व सन १८९३ मध्यें ते अलाहाबाद विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेंत उत्तीर्ण झाले. आपल्या वडील बंधूस कॉलेजचा शिक्षणक्रम पुरा करावयास मिळावा, म्हणून यांनी उच्च शिक्षणाची हांव धरिली नाहीं. हे सध्यां ग्वाल्हेर संस्थानांत शिक्षणखात्यांत आहेत. यांना इंग्रजी, हिंदी व उर्दू या भाषा चांगल्या अवगत आहेत.

यांची कविता स्वतंत्र असते. तींत भावनांचा उच्छृंखलपणा अगर विचारांची खळबळ दृष्टीस पडत नाहीं. जगांतील विषमतेनें विषण्ण झालेल्या मनाला यांच्या कविता वाचून शांति मिळते. यांच्या कविता म्हणजे सात्त्विक प्रेमाचीं कल्पनाचित्रेंच होत. यांचीं भाषा सुलभ, नादमधुर व आनंददायक अशी असते. यांच्या कवितांचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

खालील कविता म्हणजे एक 'ग्रामगीत' ( pastoral poem ) आहे. शहरांतील नकली सुखोपभोगांत जें सुख श्रीमंतांना मिळूं शकत नाहीं, तेंच सुख खेड्यांत राहणाऱ्या गुराख्याला मिळूं शकतें, व त्यांत तो किती आनंद उपभोगूं शकतो यांचें वर्णन या कवितेंत आहे.

---

## १२ दत्तात्रय कोंडो घाटे

## ( दत्त )

( १८७५–१८९९ )

दत्त कवींचा जन्म अहमदनगर येथें १८७५ मध्यें झाला. तेथेंच यांचें शिक्षण ख्रिस्तिमिशनच्या शाळेंत झालें, व पंधराव्या वर्षी यांनीं प्रवेशपरीक्षेंत उत्तम प्रकारें यश मिळविलें. सन १८९८ मध्यें ते कलकत्ता युनिव्हर्सिटीची बी. ए. ची परीक्षा पास झाले.

ज्ञानेश्वरानंतर ज्यांना 'बालकवि' अशी पदवी सार्थ लावतां येईल असे दत्तच होत. अवघ्या चोवीस वर्षांच्या कालावधींत यांनीं लिहिलेल्या कवितांपैकीं कांहीं फार सुंदर आहेत. यांच्या कवितेची भाषा सोपी, चटकदार व मनोहारि अशी आहे. यांच्या निसर्गवर्णनपर कविता फारच सुंदर असतात. यांचा कवितासंग्रह 'दत्तांची कविता' या नांवानें प्रसिद्ध आहे.

ही कविता निसर्गवर्णनपर आहे. तींत प्रभातकाळचें वर्णन केलेलें आहे.

### टीपा

समीरण = वारा. सुमनमंडळी = पुष्पवर्ग. वैतालिक = भाट. तटिनी = नदी. तुंग = उंच.

---

## १३ दत्तात्रय अनंत आपटे
## ( अनंततनय )
## ( १८७५-१९२९ )

वऱ्हाडांतील बुलढाणा जिल्ह्यांत बडनेर भोलजी या गांवीं यांचा जन्म झाला. पुण्यास भाव्यांच्या शाळेंत यांचा स्कूलफायनल परीक्षेपर्यंत अभ्यास झाला; परंतु गणित विषयाचा कंटाळा असल्या कारणानें ते त्या परीक्षेंत पास होऊं शकले नाहींत. कांहीं दिवस शिक्षकाची नोकरी केल्यानंतर यांनीं इरिगेशन खात्यांत नोकरी धरिली. यांचा जुन्या कवींच्या काव्यांचा अभ्यास दांडगा होता. यांचा कवितासंग्रह 'हृदयतरंग' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याशिवाय यांनीं लिहिलेलीं व संपादित केलेलीं अशीं 'काव्यचर्चा' 'पद्मदल' 'बालगीता' वगैरे बरींच पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

यांच्या काव्याची भाषा गोड, मधुर व ओजस्वी असून त्यांच्या काव्यांत जुन्या व नव्या कवितेचें मोठें आनंदप्रद व कौतुकावह मिश्रण झालेलें दृष्टीस पडतें. त्यांत विकारांची प्रबळता नसली तरी विचारांचा भारदस्तपणा आहे.

या कवितेंत कवीनें पुष्प व मनुष्याचें जीवित यांतील साम्य फारच सुंदर रीतीनें दाखविलें आहे, व शेवटीं दोघांनाही परमेश्वराची सेवा करून आत्मोन्नति करून घेण्याचा उपदेश केला आहे.

## टीपा

मनोज्ञ = सुंदर. विखुरिला = पसरला. वृत्त = हकीकत. पृथ्वींत = पृथ्वी-वृत्तांत. मुकुल = कळी. आमोद = सुवास. नंद = आनंद. हरिख = हर्ष. आनंद न त्याला गती = त्याची गणती करतां येत नाहीं. गतासु = मेलेला. प्रतिप्रावृटीं = प्रत्येक पावसाळ्यांत. तपी = उन्हाळ्यांत. जनु = जन्म. पृथ्वीपुटीं = पृथ्वीवर. क्षर = नाशिवंत.

## १४ राम गणेश गडकरी
## ( गोविंदाग्रज )
( १८८५-१९१९ )

केशवसुतांच्या नवीन कवितेच्या सांप्रदायाचा जर कोणी यशस्वी रीतीनें पुरस्कार केला असेल, तर तो याच कवीनें होय. शिवाय हे उत्तमपैकीं नाटककार व विनोदी लेखक होते. काव्यरचनेंत जसे केशवसुतांचे शिष्य, तसेच नाटकरचनेंत व विनोदी लेखनांत हे श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे शिष्य होत. परंतु या दोन्ही बाबतींत यांनीं आपल्या गुरूंवर आपल्या लेखनचातुर्यानें ताण केली असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. यांचीं प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, एकच प्याला, भावबंधन, राजसंन्यास व वेड्यांचा बाजार हीं नाटकें, 'रिकामपणची कामगिरी' हा विनोदी लेखसंग्रह व 'वाग्वैजयंती' हा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. हे अतिशय लोकप्रिय लेखक आहेत. यांचें जुन्या मराठी कवींचें वाचन फारच दांडगें होतें. पहिल्या प्रतीच्या प्रतिभासंपन्न कवींत यांचा बराच वरचा नंबर लागेल यांत संशय नाहीं.

यांची कविता बुद्धिप्रधान असून त्यांत कल्पनेच्या भराऱ्या पुष्कळ असतात. भाषेच्या दृष्टीनें रचना जरी टापटिपीची व निर्दोष नसली, तरी केशवसुतांप्रमाणें तींत कल्पकता फार असते. हास्य व करुण हे दोन रस खुलविण्यांत यांचा हातखंडा आहे.

भग्नहृदय कवि मध्यरात्रीं अंथरुणावर पडला असतांना कोकिळेचा शब्द त्याला ऐकूं येतो. कामांत गुंग असलेल्या मनुष्याला 'कुहूकुहू'ची किंमत क्षणिक माधुर्यापेक्षां जास्ती वाटत नाहीं. पण निराश आणि विषण्ण झालेल्या कवीच्या मनाला मध्यरात्रींचें कोकिळेचें गाणें शांतवूं शकतें. दिवसा अनावश्यक असलेले दिवे रात्रीं आवश्यक व मार्गदर्शक होतात. अंथरुणावर तळमळत पडणाऱ्या भग्नहृदयालाही कोकिळेचे साधे सूर शांतिप्रद वाटावेत, हें स्वाभाविकच आहे. कोकिळेच्या मधुर गळ्याचा उपयोग अशी मधुर शांति देणें हाच आहे.

---

# १५ एकनाथ पांडुरंग रेंदाळकर

## ( मंदार )

## ( १८८७–१९२० )

मराठी काव्यांत निर्यमक कवितेस ज्यांनीं जन्म दिला असे हेच कवि होत. यांचा जन्म कोल्हापूर संस्थानांत रेंदाळ या गांवीं झाला. लहानपणीं मराठी शाळेंत शिकत असल्यापासून यांना कविता करण्याचा नाद असे. इंग्रजी चार इयत्तेपर्यंत शिक्षण झाल्यानंतर यांनीं शिक्षणास रामराम ठोकला व मराठी शाळेंत शिक्षकाची नोकरी पत्करली. नोकरी करीत असतांना सुद्धां यांची ज्ञानपिपासा कमी न झाल्यामुळें यांनीं कै. बाळशास्त्री हुपरीकर यांच्याकडे संस्कृत काव्यांचा अभ्यास केला. 'धर्मविचार' 'करमणूक' मनोरंजन' वगैरे मासिकांचे हे सह-संपादक होते. यांच्या काव्यसंग्रहाचे दोन भाग अलिकडे प्रसिद्ध झाले आहेत.

यांची कविता स्वतंत्र व साधार अशी दोन्ही प्रकारची आहे. इंग्रजी, संस्कृत व बंगाली या भाषांतील कवितांचें त्यांनीं भाषांतर केलें असलें तरी तें शब्दास शब्द असें नसून, मूळ कवितेंतील फक्त आत्मा घेऊन त्यांनीं आपल्या सुंदर भाषेचें त्यावर आवरण चढविलेलें आहे. यांच्या कवितेची भाषा पुष्कळशी संस्कृतप्रचुर, भारदस्त व अलंकारिक असते.

या जगांतील एकंदर व्यापार कवीच्या मनास मोह पाडूं शकत नाहींत; तो या ऐहिक व्यापांत गुंतलेला दिसला, तरी त्याचें मन कोणत्या तरी अज्ञात ठिकाणीं जाऊन तेथील गूढ उकलीत असतें, व त्याचें सामर्थ्य खरोखरच अतुलनीय असतें हें तत्त्व कवीनें या कवितेंत सांगितलें आहे.

## टीपा

लास्य = लीला. उन्मनी = विरक्त.

## १६ त्र्यंबक बापूजी ठोमरे

## (बालकवि)

## (१८९१–१९१८)

आधुनिक मराठी काव्यांत निसर्गाचें वर्णन करणारे हे अप्रतिम कवि होत. यांचा जन्म खानदेशांत १८९१ सालीं झाला. वडील सरकारी नोकर असल्या कारणानें त्यांचेवर वारंवार बदलीचा प्रसंग येई. त्यामुळें यांचें शिक्षण लहानपणीं योग्य रीतीनें झालें नाहीं. पुढें आधुनिक कवि 'वनवासी' यांच्याकडे यांना शिकावयास ठेविलें. त्या ठिकाणीं त्यांचें मराठी व संस्कृत वाङ्मयाचें बरेंचसें अध्ययन झालें. वडिलांच्या मृत्यूनंतर यांनीं बरेंचसें पर्यटन केलें व त्यामुळें त्यांच्या मनावर योग्य परिणाम होऊन यांचें निसर्गप्रेम द्विगुणित झालें. सन १९०७ मध्यें जळगांव येथील कवि-संमेलनांत सर्व कवींनीं यांस 'बालकवि' ही पदवी अर्पण केली. कविवर्य टिळक यांचें या कवींवर पुत्रनिर्विशेष प्रेम होतें. हे ता. ५ मे सन १९१८ रोजीं नासिराबाद स्टेशनवर आगगाडीखालीं सांपडून दिवंगत झाले. यांच्या कवितासंग्रहाचा एक भाग प्रसिद्ध झाला आहे.

यांची कविता सोपी, प्रासादिक व निरनिराळ्या कल्पनांनीं रंगलेली अशी असते. यांच्या कवितेंतील नादमाधुर्य व कोमलत्व अद्वितीय आहे. यांच्या 'निर्झर' 'संध्यातारक' 'फुलराणी' 'अरुण' वगैरे कवितांनीं महाराष्ट्रावर घातलेली मोहिनी अद्याप दूर झालेली नाहीं. गोविंदाग्रजांची कविता बुद्धीला हलवून वाचकांच्या माना डोलविते, तर यांची कविता त्यांच्या हृदयांना हालवून डोळ्यांतून आनंदाश्रु बाहेर काढते.

सायंकाळच्या वेळीं सूर्यकिरणांत वाऱ्यावर एक कळी डोलत असतांना पाहून त्यावर कवीनें ही कविता लिहिलेली आहे. यांतील कल्पना सुंदर असून नादमाधुर्य अप्रतिम आहे. मुग्धकालिका ही रमणी व सूर्यकिरण हा रमण अशी कल्पना करून या 'फुलराणी'च्या हृदयविकासाचें कल्पनापूर्ण व हृदयंगम वर्णन कवीनें या कवितेंत केलें आहे.

# १७ शंकर केशव कानेटकर

## ( गिरीश )

## (१८९३)

कवि 'गिरीश' यांचा जन्म सातारा जिल्ह्यांत, फत्यापूर या गांवीं झाला. मराठी शिक्षण रहिमतपूर येथें व इंग्रजी शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. इंग्रजी शिक्षण घेत असतां वारंवार अडचणी आल्या तरी त्यांची पर्वा न करितां शिक्षण व नोकरी असें करीत करीत यांनीं यंदाच आपली एम्. ए. ची परीक्षा देऊन त्यांत यश मिळविलें. यांना कविता करण्याचा नाद लहानपणापासून आहे. यांची कविता 'कांचनगंगा' या नांवानें प्रसिद्ध झाली असून यांचीं 'अभागी कमल' 'कला' व 'आंबराई' वगैरे खंडकाव्यें प्रसिद्ध आहेत.

यांच्या कवितेची भाषा सोपी व प्रासादिक असते. यांच्या काव्यांत भावनांची खळबळ दृष्टीस पडते. करुणरस वठविण्यांत गिरीशांचा हातखंडा आहे. कुणबाऊ गीतें लोकप्रिय करणाऱ्या कवींत गिरीशांची गणना करावयास हरकत नाहीं.

ही कविता प्रो. कर्वे यांनीं स्थापन केलेल्या अनाथबालिकाश्रमाच्या प्रारंभींच्या खोलीस उद्देशून आहे. नदीप्रमाणें मोठ्या कार्याचेंही मूळ प्रारंभीं लहान असतें. पण आंब्याच्या एका कोयींतून हजारों आम्रफलें देणारा वृक्ष निर्माण झाला म्हणजे त्या कोयीचें सामर्थ्य जसें प्रत्ययाला येतें, त्याचप्रमाणें मोठीं कार्यें नांवारूपाला आलीं म्हणजे त्यांच्याकडे पाहून मन आश्चर्यचकित होऊन जातें. हिंगण्याचा माळ स्त्रियांच्या उन्नतीकरितां चालणाऱ्या अनेक संस्थांनीं आज फुलून गेला आहे. पण सोन्याची द्वारका स्थापणाऱ्या श्रीकृष्णाचा जन्म ज्याप्रमाणें तुरुंगांत झाला, त्याप्रमाणें या सर्व संस्थांचा उगम अनाथबालिकाश्रम ज्या एका लहान खोलींत प्रो. कर्वे यांनीं सुरू केला, त्यांत झाला. प्रो. कर्वे यांच्या स्फूर्तिदायक 'आत्मवृत्तां'तील या कार्याचा व त्याच्या विस्ताराचा वृत्तांत विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचावा.

---

## १८ प्रो. वासुदेव गोविंद मायदेव

### ( वनमाली )

( १८९४ )

कविवर्य तांबे यांच्या शिष्यमालिकेंत प्रामुख्यानें ज्यांची गणना करतां येईल, असे हे कवि आहेत. हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून प्रो. कर्वे यांच्या महिला विद्यालयांत अध्यापक आहेत. यांचा कवितासंग्रह 'भावतरंग' या नांवानें प्रसिद्ध आहे.

यांच्या कवितांची भाषा सोपी परंतु भावनापूर्ण अशी आहे. यांच्या कवितांत बालकांच्या भावनांना प्रमुख स्थान दिलेलें दृष्टीस पडतें. खुसखुशीत विनोदही ते करूं शकतात.

आपल्या लहान बालकाला मुकलेल्या अभागी मातेचे उद्गार या कवितेंत आहेत. आपलें मूल जिवंत असतांना ज्या ज्या गोष्टी करीत असे, त्याच गोष्टी तिला आतां आठवत असून, आपला मुलगा अद्याप हयात आहे, असाच तिला भास होत आहे. ही कविता एक शोकगीत ( elegy ) आहे. गडकऱ्यांच्या 'राजहंस माझा निजला' या कवितेंतील कल्पनांच्या भराऱ्या यांत नसल्या कारणानें, हें साधें व खरेंखुरें प्रेमळ मातृहृदय दर्शविणारें शोक-गीत झालें आहे.

---

## १९ प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन, एम्. ए.

### ( माधव ज्युलियन् )

( १८९४ )

'माधव ज्युलियन्' हे पुणें येथील रविकिरणमंडळाचे एक प्रमुख सभासद असून सध्यां ते कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांत अध्यापक आहेत. फारसी भाषेवर यांचें प्रभुत्व आहे. त्यांनीं 'फारसी-मराठी कोश' तयार केला असून 'रुबाया' हें फारसी काव्य भाषांतरित केलें आहे. याशिवाय यांनीं 'सुधारक' व 'विरह-तरंग' हीं काव्यें व प्राचीन व अर्वाचीन मराठी छंदांवरील

'छंदोरचना' या नांवाचें एक पुस्तक, इतकीं पुस्तकें लिहिलीं आहेत. याशिवाय यांची विविध विषयांवरील कविता पुष्कळ आहे.

यांच्या कवितेची भाषा ओजस्वी, स्वतंत्र व नवविचारपरिपूर्ण अशी असते. एखादी कल्पना समाजास पसंत पडणार नाहीं म्हणून न भितां ते ती छातिठोकपणें पुढें मांडतात. फारसी भाषेच्या परिचयामुळें यांच्या काव्यांत फारसी शब्दांचा भरणा पुष्कळच आढळून येतो.

या कवितेंत माधव ज्युलियनांचा स्वभाषेबद्दलचा अभिमान व तीवरील निरतिशय प्रेम व्यक्त होतें. आपल्या मायभाषेच्या अभिन्नत्वामुळें धार्मिक, राजकीय अगर सामाजिक भिन्न भिन्न पंथानुयायांची सुद्धां तिच्या उन्नतीप्रीत्यर्थ कशी तळमळ होते याचें या कवितेंत उत्तम चित्र रेखाटलें आहे.

## टीपा

लक्तर = फाटकें वस्त्र, पक्षीं शब्दसंपत्तीची दीनावस्था. कुद्रती = नैसर्गिक. अस्करा = ख्याति; कीर्ति.

---

## २० यशवंत दिनकर पेण्ढरकर

## (यशवंत)

## (१८९९)

'यशवंत' मूळचे चाफळचे राहणारे. त्यांचें दुय्यम शिक्षण सांगली येथें झालें. मॅट्रिक झाल्यानंतर त्यांनीं सरकारी नोकरी धरिली. सध्यां ते पुणें येथें असतात. प्रथमतः सांगलीचे कवि साधुदास यांचें शिष्यत्व पत्करून व नंतर रविकिरण मंडळाचे सदस्य होऊन यांनीं काव्यरचना केली. गेल्या दहा वर्षांत उदयाला आलेल्या कवींत यांच्या इतकीं सुंदर भावगीतें दुसऱ्या कोणींही लिहिलेलीं नाहींत. कल्पनाप्राचुर्य व उत्कट भावना हे काव्यगुण यांच्या अनेक कवितांतून चांगल्या रीतीनें व्यक्त झालेले आहेत. यांचा काव्यसंग्रह 'यशोधन' व 'भावमन्थन' या नांवानें प्रसिद्ध आहे.

'आशीर्वाद' या कवितेंत आयुष्यांतील कटु अनुभवामुळें स्वतःच्या हाताला यश नाहीं अशी समजूत झालेल्या प्रेमळ वडील मनुष्याच्या भावनाप्रधान अंतःकरणाचें चित्र रेखाटलें आहे. हृदयांतल्या प्रेमोर्मीपेक्षांही प्रेमविषयाच्या कल्याणाची इच्छा अधिक प्रबळ असते, असें कवीनें मोठ्या मार्मिकतेनें दाखविलें आहे.

# मॅक्‌मिलन्‌चीं शालोपयोगी पुस्तकें

मॅकणेडा मराठी किस्ते नं. १ ते ५ कि. प्रत्येकी चार आणा.
मॅकमिलन्‌चें मराठी किस्ते, नं. १ ते ७, प्रत्येकीं कि. रु. ०-१-६
महाराष्ट्राच्या इतिहासांतील सोप्या गोष्टी, गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए., कृत; कि. रु. ०-६-०
हिंदुस्थानचा इतिहास. ई. मार्सडेन, बी. ए., कृत; कि. रु. १-४-०
हिंदुस्थानच्या इतिहासांतील सोप्या गोष्टी, सचित्र, ई. मार्सडेन, बी. ए., कृत; कि. रु. ०-१२-०
इतिहासाचे प्राथमिक पाठ, सचित्र, ई. मार्सडेन, बी. ए., कृत; कि. रु. ०-१४-०
ब्रिटिश साम्राज्याचा संक्षिप्त इतिहास, जी ॲन्डरसन्, व ई. मार्सडेन, बी. ए., कृत. कि. रु. १-०-०
इंग्लंडचा अर्वाचीन इतिहास, परशुराम हरी बर्वे, एम्. ए., बी. टी., कृत; कि. रु. २-८-०
भूगोलविद्येचे प्राथमिक पाठ, ई. मार्सडेन, बी. ए., कृत; कि. रु. १-२-०
भूगोलवर्णन, ई. मार्सडेन, बी. ए., कृत; कि. रु. १-१२-०
संस्कृत-अभिनवा पाठावलिः, प्रो. विनायक पांडुरंग बापट, एम्. ए., एस्. टी. सी. डी., कृत; प्रथमा, कि. ८ आणे, द्वितीया, १२ आणे, तृतीया, १ रुपया.
प्राथमिक शिक्षणाच्या मराठी शाळांतील शिक्षकांचें हस्तपुस्तक, ज. ए. रिचे, एम्. ए., कृत; कि. रु. १-८-०
वाग्विहार, भाग १, प्रो. गणेश हरि केळकर, एम्. ए., कृत; कि. रु. १-०-०
वाग्विहार, भाग २, प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन, बी. ए., कृत; कि. रु. १-४-०
जगाचें वाङ्मय, ग. प. सबनीस, एम्. ए. (केंब्रिज्), एम्. आर्. ई. एस., कृत; कि. रु. १-४-०
रसतरंगिणी, प्राचीन व अर्वाचीन कवितांतील निवडक वेंचे, सीताराम वासुदेव पेंडसे, बी. ए., एस्. सी. पी., कृत; कि. रु. २-८-०
आरोग्यविज्ञान, रामचंद्र महादेव जोशी, एम्. ए., एलएल्. बी., बी. एस्सी. (लंडन), आय्. ई. एस., कृत; कि. रु. १-८-०
संस्कृत गद्यावली, पांडुरंग वामन काणे, कृत; कि. रु. १-८-०
संस्कृत पद्यावली, पांडुरंग वामन काणे, कृत; कि. रु. १-०-०
संस्कृत-शिक्षिका, रा. ब. कमलाशंकर प्राणशंकर त्रिवेदी, बी. ए., कृत; कि. रु. २-०-०
चित्रमय अंकगणित, वि. पा. बोकील, एम्. ए., एम्. टी. सी. डी., व ग. करंदीकर, कृत; कि. ०-६-०

---

Selections from Marathi Poetry. By R. V. Kamat.
Price 8 Annas. 1932.